## दोन शब्द

औषधी झाडे हा शब्द म्हटला की डोळ्यासमोर अद्‌भुत किंवा दैवी शक्ती असलेल्या वनस्पतींचा विचार येतो. आमच्या पुरातन ग्रंथात नुसत्या असाध्य, अवघड रोगांना बरे करणाऱ्या वनस्पतींचा उल्लेखच येत नाही तर त्यांचा संबंध चमत्कार, जादू वगैरेशीही दाखवण्यात येतो. उदा. आपण वाचतो की काही प्रकारच्या बिया वशीकरणासाठी एखाद्यावर फेकल्या जातात, काही प्रकारच्या मुळ्या दिर्घायुषी होण्यासाठी चघळल्या जातात, किंवा काही झांडांच्या रसाचे थेंब मेलेल्याला जिवंत करण्यासाठी त्याच्या तोंडात टाकण्यात येतात. पूर्वीच्या काळी औषधी वनस्पतींची विश्वासार्हता व मान्यता त्यांच्या परीक्षणावर, संशोधनावर अवलंबून नसे तर साधू महात्म्यानी सांगितल्या किंवा दिल्या म्हणजे मान्यताप्राप्त मानण्यात येत असत. हे संभव आहे की हे त्या काळच्या परिस्थितीनुसार असेल.

मानव युगपरिवर्तनाबरोबर प्रत्येक गोष्टीला कारणांची व प्रयोगांची पट्टी लावू लागला आणि ज्या गोष्टींना पूर्वी सोनेरी दिवस होते त्या कारणाअभावी आता मागे पडू लागल्या. याचाच परिणाम म्हणजे औषधी वनस्पतींचा वापर कमी होऊ लागला. आज मात्र औषधी वनस्पतींच्या प्रत्यक्ष प्रसाराऐवजी तो केवळ वादविवाद व चर्चेचा विषय झाला आहे. ही परिस्थिती का असावी?

प्रगत राष्ट्रे ज़ेव्हा त्यांच्याकडील झाडांच्या व त्यांच्यातील घटकांच्या वापराविषयी संशोधनात कार्यरत् होती तेव्हा आम्ही मात्र फक्त आमच्या गतकालीन वैभवाविषयी, आमच्या चमत्कारिक अद्‌भुत झाडाविषयी चर्चा व बोलण्यावरच संतुष्ट राहिलो. याचवेळी विदेशी औषधांचे पण आम्ही उत्स्फूर्तपणे स्वागत केले आणि या गदारोळातच आम्ही आमच्या मान्यताप्राप्त आयुर्वेदिक औषधीही साफ विसरलो. आमच्यापैकी बऱ्याच लोकांनी आमच्या औषधी वनस्पतींमध्ये काही उपयोगी गुणधर्म समजण्याचे तर सोडा पण त्यांचा विचार देखील केला नाही.

सुमारे ५० वर्षापूर्वीपर्यंत आमच्या झाडांची शास्त्रीय परिक्षणे झाली नव्हती व म्हणून त्यापेक्षा उपयोगीपणाविषयी किंवा उपयोगी नसण्याविषयी काही निश्चितपणे सांगता येत नसे. यामुळे जे काही पूर्वीचे लिहून ठेवलेले होते त्याचीच सतत व वारंवार पुनरावृत्ती होत गेली आणि यातच काही अवैद्य वनस्पतींची माहिती आमच्या साहित्यात शिरकाव करून बसली. या वनस्पतींचा प्रसारही होत गेला. या संबंधी मी प्रस्तावनेत विचार मांडले आहेत.

~~आज अनेक~~ प्रकारची लहान मोठी भारतीय औषधी वनस्पतींची माहिती देणारी

प्रकाशने प्रसिध्द झालेली आहेत. त्यातील काही आयुर्वेदिक चिकित्सकांसाठी, काही वनस्पती तज्ज्ञांसाठी, काही रसायनशास्त्रासाठी तर काही औषधनिर्मात्यांसाठी लिहिलेली आहेत. परंतु प्रस्तुत प्रकारचे पुस्तक भारत देश आणि लोक या नॅशनल बुक ट्रस्टच्या मालिकेतील पुस्तकांतील एक आगळे वेगळे प्रकाशन आहे. या प्रकाशनाची या मालिकेतील आतापर्यंतची पुस्तके आपआपल्या जागी वैशिष्ट्यपूर्ण आहेत. या आधींच्या प्रत्येक विषयातील प्रकाशनापेक्षा हे निश्चितपणे सरस व माहितीपूर्ण आहे. या अनेक विषयांमध्ये भारतीय औषधी वनस्पती हा विषय निवडल्याबद्दल मी ट्रस्टचे अभिनंदन करतो.

या पुस्तकात फक्त विश्वसनीय माहिती असलेल्या शंभर झाडांची निवड करण्यात आली आहे. औषधी वनस्पतींविषयी आज इतके अफाट व विखुरलेले साहित्य प्रकाशित झालेले आहे की माझ्याकडून अगदी अलिकडचे संदर्भ सुटले असण्याची शक्यता आहे. या संबंधात उपयोगी सूचनांचे मी सहर्ष स्वागत करीन.

रंगीत, कृष्णधवल आणि रेखाचित्रे अनेकांकडून जमा करण्यात आलेली आहेत. यासाठी मी खालील व्यक्तींचा व संस्थांचा आभारी आहे.

निदेशक, वनस्पती सर्वेक्षण विभाग, प्रमुख संपादक प्रशासन आणि माहिती विभाग, निदेशक सी. एस्. आय्. आर. नवी दिल्ली, शेतकीखाते आणि फळबागाखाते म्हैसूर, वनस्पती शास्त्र विभाग, नवी दिल्ली, डॉ. के सुब्रमण्यम, श्री. के. श्रीनिवासन, डॉ. एम्. ए. राव, स्व. डॉ. एच. बी. सिंग, डॉ. आर. एस्. राव आणि डॉ. ए. डी. सैनी.

हे दोन शब्द पूर्ण करण्याआधी मी काही वर्षा पुर्वी वाचलेल्या वाक्याची वाचकांना आठवण करून देऊ इच्छितो की, जर लेखक त्या वेळीची वाट पाहात राहिला की ज्यावेळी त्याच्या लिखाणात काही संशोधन किंवा टीकेस वाव मिळणार नाही, तर कुठलेही लिखाण पूर्ण होऊ शकत नाही.

**सुधांशु कुमार जैन.**

# अनुक्रमणिका



## झाडांची वर्णने

# चित्र-सूचि

## रंगीत छायाचित्र



## रेखाचित्रे

# प्रस्तावना

वैद्यकशास्त्र आणि शल्यचिकित्सापध्दतीचा उगम मानवाच्या उत्पत्तिबरोबर झाला असावा. परंतु नोंदी ठेवण्याची कुठलीही पध्दत तेव्हा अस्तित्वात नसल्याने त्याकाळी वापरात असलेल्या चिकित्सापध्दतीची माहिती होत नाही. त्याकाळी मानवाची दुःखे आणि त्यावरील उपचार हे धर्म, दंतकथा आणि जादूटोण्याशी निगडित असत. या शिवाय निश्चित, संयुक्तिक औषध योजना अस्तित्वात असावी. जेव्हा आजच्या वैज्ञानिक युगाचा मानव उत्सुकतेपोटी भूतकाळात दृष्टी टाकतो, तेव्हा त्याला त्याकाळी पुरातनकाळात लिहिलेले, अर्धवट लिहिलेले काही ना काही पुरावे सापडतात. यावरून आमच्या पूर्वजांची योग्यता, दूरदर्शिता याचे दर्शन घडते.

ऋग्वेदात दिलेल्या काही रोगनिवारक वनस्पतींचे संदर्भ हे औषधी वनस्पतींच्या वापराविषयीची भारताच्या इतिहासातील सुरुवातीची नोंद ठरते. ऋग्वेदाच्या सूक्तांत संदर्भ दिलेल्या अनेक वनस्पतींची ओळख आजही पटू शकते. उदाहरणार्थ काटेसावरी, पिथवन, पळस, पिंपळ परंतु ऋग्वेदात झाडांचे संक्षिप्त संदर्भ आलेले आहेत. सविस्तर वर्णने अथर्ववेदात मिळतात. ऋग्वेदाचा काळ अंदाजे ३५०० ते १८०० खिस्तपूर्व धरण्यात येतो. वेदकाळानंतर सुमारे १००० वर्षे भारतात या शास्त्राच्या प्रगतीसंबंधी कुठलीही माहिती उपलब्ध होत नाही.

यानंतर भारतीय वैद्यकशास्त्रावर दोन फार महत्त्वाचे ग्रंथ निर्माण झाले. चरकाचा चरकसंहिता व सुश्रुताचा सुश्रुतसंहिता. सुश्रुतसंहितेत सुमारे ७०० औषधांची माहिती आहे. यातील काही औषधे भारताबाहेरील आहेत. जसजसा काळ लोटत गेला, तसतसा स्वदेशी वैद्यकशास्त्रात अनेक नवीन झाडांचा प्रवेश झाला व भारतीय औषधी वनस्पतींची संख्या १५०० च्या घरात पोहोचली.

आज भारतातील औषधी वनस्पतींची माहिती देणारी अनेक लहान मोठी पुस्तके अस्तित्वात आहेत. यातील काही शेकडो पानांच्या अनेक खंडात आहेत. काहीवेळा एकाच झाडाच्या उपयुक्त गुणधर्मांविषयी भारताच्या विविध भागांत प्रचंड तफावत आढळते. प्रादेशिक भाषांमध्येही अफाट ग्रंथनिर्मिती झाली आहे. यू. सी. दत्त, जी. वॅट, आर. एन. चोप्रा (त्यांचे सहकारी व विद्यार्थी), के. एम. नाडकर्णी, के. आर. कीर्तिकर, बी. डी. बसू, बी. मुखर्जी, चंद्रराज भंडारी, के. विश्वास, के. पी. त्रिवेदी, देवीशरण गर्ग, 'भारताची संपदा' (वेल्थ ऑफ इंडिया) चे संपादक आणि इतर अनेक विद्वानांनी बरीच माहिती एकत्रित करण्याचे कठीण कार्य केले आहे.

काही लेखकांनी झाडांच्या योग्य ओळखीशिवाय किंवा वापरासंबंधी छाननी न

करता माहिती ज़मा केली आहे. वस्तुतः असेही दिसते की काही वनस्पती माणसाच्या डोक्यापासून ते पायाच्या पंज्यापर्यंतच्या सर्वच रोगांत उपयोगी समजण्यात आल्या आहेत.

पुरातन ग्रंथभांडारात चमत्कारिक वनस्पती किंवा आश्चर्यकारक औषधांचा उल्लेख नेहमी आढळतो. त्याकाळच्या लोकांकडून झाडांचे प्रमाणित नमुने सुरक्षित ठेवले गेले नाहीत हे स्वाभाविक आहे. झाडांची योग्य वर्णनेही सापडत नाहीत. झाडांच्या सविस्तर वर्णनाशिवाय त्यांच्या खऱ्या ओळखीचा निर्णय व्यवहारदृष्ट्या असंभव आहे. म्हणून अशावेळेस पूर्वी दिलेली झाडाची स्थानिक नावे दिशाभूल करणारी असतात. एकच स्थानिक नाव किंवा औषधाचे नाव संदर्भाचे साधन ठरते. काहीवेळा स्थानिक नाव एकापेक्षा अनेक झाडांसाठी वापरल्याची उदाहरणेही बरीच आहेत. उदा. पुनर्नवा, ब्राम्ही, बाळा, दुधी वगैरे नावांनी संदर्भित आहेत. भारतातील काही संशोधक प्राचीन ग्रंथात उल्लेखिलेल्या महत्त्वाच्या औषधांची नावे निश्चित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. यामुळे बराच गोंधळ दूर होईल.

प्राचीन औषधी वनस्पतीच्या पूर्ण किंवा अपूर्ण लेखी नोंदीशिवाय काही ज्ञान अनादि काळापासून पिढ्यान् पिढ्यासुध्दा चालत आले आहे आणि ते आज असलेल्या आदिवासी समाजामध्ये अस्तित्वात आहे. लांब निबिड जंगलात वास्तव्य करणाऱ्या आदिवासींमध्ये हे ज्ञान दंतकथेतून चालत आलेले आहे. काहीवेळा ते ज्ञान सखोल व परिपूर्ण नसले तरी, दंतकथेच्या स्वरूपात नोंदी घेण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. अशा प्रकारचा अभ्यास 'एथ्नोबॉटनी' या वनस्पतीशास्त्राच्या विशेष शाखेत वर्गीकृत करण्यात आला आहे. या विषयाच्या संशोधनास मी मध्य भारतातील आदिवासी समाजामध्ये सुरुवात केली होती. आतापर्यंत माहीत नसलेल्या व ग्रंथात न उल्लेखिलेल्या अनेक प्रकारच्या झाडांचे औषधी उपयोग शोधण्यात आले. काही झाडांचे लक्षणीय अवलोकन या पुस्तकात समाविष्ट करण्यात आले आहेत. तथापि ते वैज्ञानिक परीक्षेस उतरावयाचे आहेत.

औषधी वनस्पती आधुनिक वैज्ञानिक कसोटीस पात्र ठरवण्याचा प्रश्न नेहमी उद्‌भवतो. परिचित आणि प्रसिध्द औषधी वनस्पतीपासून काढलेले ॲल्कलॉइड्स केव्हा केव्हा रुग्णविषयक व औषधशास्त्राच्या कसोटीत अगदीच नकारात्मक परिणाम दाखवितात. या अर्थी या अवलोकनांमुळे आपल्याला अशा वनस्पतींची काळजीपूर्वक व बारकाईने तपासणी करणे आवश्यक आहे. ही या वादग्रस्त मुद्याची दुसरी बाजू ठरते. झाडाचे सामर्थ्य त्याच्यापासून वेगळ्या केलेल्या एक किंवा अनेक रसायनांवर अवलंबून असावे हेही शक्य आहे. तथापि, झाडे जमा करण्याची वेळ, वाढीची अवस्था (फुललेले किंवा कलिकावस्थेत, कोवळी किंवा जरठ पाने, फुलण्यापूर्वी किंवा फुलण्यानंतरची अवस्था) नैसर्गिक वाढीची किंवा लागवडीची जागा इत्यादी गोष्टी औषधी गुणधर्मांवर परिणाम करतात.

माणसाच्या आजारावर भारतात प्रचलित असलेल्या सुमारे २००० औषधांपैकी, २०० प्राण्यांपासून व तेवढीच खनिजांपासून निर्माण करतात. उरलेली १५०० औषधे वनस्पतीपासून मिळतात. आपल्या देशाचे फार मोठे क्षेत्र आणि तिथे असणारा विविध वनस्पतींचा खजिना बघता ही संख्या फारशी मोठी नाही. भारतातील तपमान (४९ से. - ४३ से.) पर्जन्यमान (१०० मि. मि. ते १०,००० मि. मि. वर) आणि उंची (समुद्रसपाटीपासून ते ६००० मिटर) च्या आवाक्यामुळे १५००० च्यावर उच्चश्रेणीच्या म्हणजे अनावृत्त व आवृत्त बीजवनस्पतींच्या जाती भारतात सापडतात.

प्रस्तुत पुस्तकासाठी १५०० औषधी वनस्पतीतून सुमारे १०० महत्त्वपूर्ण वनस्पती घेतल्या आहेत. वास्तविक या वनस्पतींची निवड म्हणजे एक कठीण कार्य आहे. साधारणतः ज्या वनस्पती त्याच्या औषधी गुणधर्मांवरून परिचित व चाचणी केलेल्या आहेत, त्या इंडियन फार्मस्यूटिकल कोर्डेक्स आणि ब्रिटिश फार्मस्यूटिकल कोर्डेक्स किंवा आणि युनायटेड स्टेट्स डिस्पेंसेटरीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. यात प्रामुख्याने फक्त भारतात मिळणाऱ्या वनस्पती घेतल्या आहेत. काही विदेशातून आणून लावलेल्या व्यावहारिक दृष्ट्या किंवा औषधी दृष्ट्या महत्त्वाच्या आहेत. किंवा ज्या आता भारतात नियमितपणे लागवडीखाली आल्या आहेत.

या पुस्तकाताल प्रकरणांची नावे परिचित किंवा व्यावहारिक औषधी नावांवरून घेण्यात आलेली आहेत. शक्य तिथे एक किंवा अनेक व्यावहारिक नावेही कंसामध्ये दिलेली आहेत. ही प्रकरणे वनस्पतींच्या शास्त्रीय नावाच्या इंग्रजी वर्णमालेनुसार मांडली आहेत. शक्यतोवर अगदी अलीकडचे शास्त्रीय नाव वापरले आहे. जे वाचक जुन्या नावांशी परिचित आहेत, त्यांच्या सोयीसाठी एक किंवा दोन परिचित जुनी पर्यायी नावे दिली आहेत.

झाडाच्या कुळांच्या नावानंतर भारतीय नावे दिली आहेत. यात प्रथम मराठी नंतर हिंदी आणि इतर भाषेतील नावे इंग्रजी वर्णमालेच्या क्रमानुसार देण्यात आलेली आहेत.

झाडांची थोडक्यात माहिती दिली आहे. याबरोबरच झाडांची अशी लक्षणे दिलेली आहेत की ज्यामुळे वाचकास त्यांची सर्वसाधारण रचना किंवा प्रकार आणि त्यांच्या भागांची कल्पना यावी. शक्यतोवर तांत्रिक शब्द आणि तपशील टाळण्यात आला आहे. माहितीची अचूकता रहावी म्हणून फक्त अशा ठिकाणी तांत्रिक शब्द आवश्यक म्हणून ठेवण्यात आलेले आहेत. वनस्पतींची वर्णने सांकेतिक थोडक्यात व अचूक असावी असा वनस्पती शास्त्राचा नियम आहे. तो इथे पाळण्यात आला आहे झाडाची वर्णने अनेक शुष्कोधिसंग्रहांवर आधारित आहेत.

भारतात वनस्पतींचे वितरण जरी सर्वसाधारण वाटत असले तरी शक्यतोवर ते विश्वसनीय ग्रंथातून व जमा केलेल्या शुष्कोधिसंग्रहावरून निश्चित केले आहे.

औषध आणि त्याच्या गुणधर्माची माहिती विश्वसनीय प्रकाशनांतून घेतलेली आहे. ज्या ब्रिटिश फार्मस्यूटिकल कोर्डेक्स किंवा युनायटेड स्टेट्स डिस्पेंसेटरीमध्ये समाविष्ट आहेत किंवा ज्यांचे गुणधर्म प्राण्यांवर व रुग्णांवर केलेल्या प्रयोगाने सिध्द झालेले आहेत फक्त त्याच औषधी वनस्पती घेतल्या आहेत. यासाठी लेखकाने मागील तीस वर्षांच्या संबंधित नोंदी चाळल्या आहेत. हे ग्रंथ चाळत असतांना प्रस्तुत लेखकाच्या असे निदर्शनास आले आहे की फारच थोड्या वनस्पतींवर रुग्णविषयक किंवा औषधशास्त्रविषयक प्रयोग झालेले आहेत. वनस्पतींचा वापर वाढवण्यासाठी आम्हाला अशा फार मोठ्या प्रकारच्या प्रायोगिक कामाची गरज आहे.

लाकूड, अन्न व इतर औषधीबाबतची सर्वसाधारण माहिती 'इतर उपयोग' या मथळ्याखाली दिलेली आहे.

काही प्रजातींमधल्या जातींशिवाय इतर महत्त्वाच्या जातींचाही उल्लेख करण्यात आलेला आहे.

भारतातील औषधांच्या वार्षिक गरजेसंबंधी निश्चित माहिती नाही. काही औषधांबद्दलची माहिती केंद्र सरकारने काही वर्षांपूर्वी केलेल्या अनुमानावर आधारित आहे.

या पुस्तकाचा हेतू वेगवेगळ्या रोगांसाठी उपाययोजना देणे हा नव्हे तर अगदी महत्त्वाच्या भारतीय औषधी वनस्पतींशी वाचकांना अवगत करणे हा होय. अनेक तयार औषधांत एकापेक्षा जास्त किंवा अनेक झाडांच्या औषधी तत्त्वांना योग्य प्रमाणात मिसळणे, योग्य प्रक्रिया, औषधाचे प्रमाण हे आजाराच्या चिकित्सेत महत्त्वाचे घटक आहेत. कुणीही वाचक स्वतःहून या पुस्तकात दिलेल्या वनस्पतींचा वापर करणार नाही अशी आशा आहे. खास उपाययोजनांना वेगवेगळ्या परिस्थितीची गरज असते, आणि हे काम विशेषज्ञाचे आहे हे वाचकांनी विसरू नये.

आधुनिक औषधशास्त्राच्या व शल्यचिकित्सेच्या अल्पकाळातही व्यापक वाढीमुळे औषधी वनस्पतींची विश्वासार्हता व लोकप्रियता हळूहळू कमी होत आहे, पण या स्वदेशी वैद्यकशास्त्रासंबंधी बरेच सांगण्यासारखे आहे. याचे विवेचन या पुस्तकात होऊ शकत नाही. ज्या देशामध्ये ८०% जनता खेड्यांमध्ये रहाते, ज्यांचे दरडोई, दर दिवसाचे उत्पन्न केवळ ८० किंवा ९० पैसे आहे त्या जनतेसाठी अवघड व महागडी उपाययोजना काय कामाची?

# १. खोकली

**अ‍ॅकॅलिफा इंडिका** L **आकृती - १**

*कुल :* युफोर्बियेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *खोकली*
हिंदी - *खोकली, कुपी*
बंगाली - *मुक्ताझुरी, मुक्ताबारसी*
गुजराती - *वेंछिकाटो, चररजी-झाड*
मल्याळी - *कुप्पामणि*
उडिया - *इंद्रमारिस*
संस्कृत - *हरित्तमंजरी*
तेलुगू - *कुप्पेमणि*

खोकली हे व्यावहारिक नाव भारतीय स्थानिक भाषेवरून घेतले आहे.

## वर्णन

एक वर्षीय, ७५ से. मी. उंच, औषधी; पाने ३ ते ८ से. मी. लांब अंडाकृती, तीन शिरा असलेली, पानाचे काठ दातेरी, देठ पात्यापेक्षा लांब; फुले पानांच्या कोनात, कणिशक समूहात, मादीफुलाच्या खाली, पाचराच्या आकाराचे सहपत्र, नरपुष्प लहान, कणिशक समूहात टोकास; फळे लहान, केंसधारी सहपत्रात लपलेली.

## वितरण

हे झाड सपाट पठारी भागात भारतात जवळपास सगळीकडे सापडते. बागेत, शेतात तण म्हणून उगवते किंवा टाकाऊ जागेवर व रस्त्याच्या बाजूला सापडते.

## औषधी गुणधर्म

संपूर्ण झाड फुले आल्यावर जमा करून वाळवल्यास खोकली नावाचे औषध मिळते.

या औषधाचे गुणधर्म इपेकॅक् औषधासारखे आहेत. ते दम्यावर, फुफ्फुसांच्या नळ्या सुजण्यावर, फुफ्फुसज्वरावर आणि संधिवातावर चालते. याच्या मुळ्यांनी आणि पानाने सौम्य रेचक होतात. पानाचा रस वांत्या होण्यासाठी महत्त्वाचे औषध आहे. व्रण आणि क्षतावर ताज्या पानांची पोटीस उपयोगी पडते.




रेखाचित्र क्र. १ खोकली (अॅकॅलिफा इंडिका)

# २. अॅकॉनाईट

**अॅकॉनिटम् जाती**

*कुल* : रॅनन्क्युलेसीई

*भारतीय नावे :* *अॅकॉनिटम चासमॅन्थम* Stapf ex Holmes :
काश्मिरी – *मोहरी;*
*अॅकॉनिटम डिनोऱ्हायझम* Holmes ex Stapf :
काश्मिरी – *दुधिया-बिष, सफेदबिश मोहरा*
*अॅकॉनिटम हेटेरोफायलम* Wall. काश्मिरी-*अतीस, अतीविष, पोदिस.*

अॅकॉनाईट हे नाव या समूहाच्या शास्त्रीय नावाशी निगडित आहे.

अॅकॉनाईट औषध म्हणजे या झाडाच्या गाठदार मुळ्या आहेत. वैद्यकशास्त्रात त्यांच्यातील काही विशिष्ट विषारी गुणधर्मामुळे सर्वपरिचित आहेत. ब्रिटिश फार्मकोपिया या औषधास *अॅकॉनिटम नापेलस* या जातीपासून ओळखते. ही जात भारतात आढळत नाही पण भारतीय जाती मात्र गुणांनी या जातीच्या बरोबरीच्या आहेत.

***अॅकॉनिटम् हेटेरोफायलम्*** : (अतीस) हे झाड हिमालयाच्या उंच वायव्य भागात समुद्रसपाटीपासून २००० ते ४००० मीटर उंचीवर मिळते. या जातीपासून मिळणारे औषध फारसे विषारी नसते. हे तापात आणि तापानंतरच्या अशक्तपणात, अतिसारात व अतिसारात रक्त पडणे यावर वापरण्यात येते. हल्ली हे औषध शक्तिवर्धक म्हणून वापरात आहे. मात्र ते तापावर गुणकारी समजण्यात येत नाही.

***अॅकॉनिटम् चासमॅन्थम्*** : (बनबलनाग) हे पण हिमालयाच्या वायव्य भागात सापडते व ते अतीस मिळत असलेल्या जागेजवळ सापडते. या झाडांतून काढलेले अॅकॉनाईट हे *अॅकॉनिटम नापेलस* या झाडाच्या अॅकानाईट सारखेच आहे. बनबलनागमध्ये युरोपियन अॅकॉनाईटपेक्षा १० पट अॅल्कलॉइड जास्त आहे पण त्याची औषध क्षमता कमी आहे.

***अॅकॉनिटम् डेनोऱ्हायझम्*** : आणि इतर जाती भारतात सापडतात पण त्या विशिष्ट औषध उपाययोजनेत वापरतात. भारतीय अॅकॉनाईट (बाजारात मिळणारे) २ किंवा ३ जातीचे मिश्रण असते.

अॅकॉनाईटमध्ये सापडणारे अॅल्कलॉईड अतिशय विषारी आहे आणि नियंत्रित प्रमाणात दिले नाही तरी दुष्परिणाम दिसतात.

डोंगराळ भागातील झाडात ॲकॉनाईट विपुल प्रमाणात सापडते. विषारीपणा हा ॲकॉनाईट शिवाय इतर पदार्थामुळे असतो. विषारी गुणधर्मामुळे हे औषध नियंत्रित प्रमाणात देण्यात येते. या औषधाचा मुख्य उपयोग मज्जा विकृतीत बाहेरून लेप लावण्यासाठी होतो.

# ३. वेखंड

**ॲकोरस् कॅलामस् L.**

*कुल* : आरेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *वेखंड*
*हिंदी - बच, घोडाबच, सफेदबच*
आसामी - *थेमेप्रि*
बंगाली - *बच*
गुजराती - *गंधिलोवज*
कानडी - *बजेगिडा*
मल्याळी - *वासंपे*
संस्कृत - *भूतनाशिनी*
तामिळ - *वाशंभू*
तेलुगू - *वसा*

## वर्णन

झाड लहान व लांब सुगंधी बहुशाखीय जमिनीत वाढणाऱ्या खोडांनी युक्त (मूलस्तंभे); कणिसाचा अक्ष पानासारख्या महाछदाने झाकलेला; फुले लहान हिरवट, ५ ते १० से. मी. लांब, गोल कणिसात; कणिशकास छदकणिश म्हणतात; फळे पिवळसर रंगाची.

## वितरण

हे झाड भारतात समुद्रसपाटीपासून २०० मीटर उंचीच्या, मुख्यतः ओलसर व दलदलीच्या जागी सापडते किंवा हिमालयाच्या आग्नेय, ओलसर भागात सापडते. कर्नाटकात व भारताच्या इतर भागात याची लागवड करतात.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेले मूलस्तंभ म्हणजे वेखंड होय आणि हे औषधात वापरतात.

वेखंडात बाष्पनशील तेल असल्याने ते वायूनाशी म्हणजे पोटाचे फुगणे आणि तत्सम वाटणे यावर गुणकारी आहे. वेखंडामुळे पचनशक्तीत वाढ होते. वेखंड हे पोटदुखीवर घरगुती उपाय म्हणून प्रसिद्ध आहे. यात असलेल्या बाष्पनशील तैलद्रव्यामुळे हे कफ पडण्यास मदत करते. वेखंडामुळे घशातील ग्रंथी वाहतात तसेच ते दम्यावर गुणकारी आहे. यात असलेल्या टॅनिन या द्रव्यामुळे ते संग्रहणी, रक्ताचा अतिसार यावर उपयोगी आहे. वेखंड मोठ्या प्रमाणात घेतल्यास ते वांतीकारक म्हणून काम करते आणि मोठ्या प्रमाणावर वांत्या होतात. पाने आणि मूलस्तंभ सुगंधी पदार्थात, पेयात आणि कीटकनाशके तयार करण्यात वापरतात. मूलस्तंभातील तेल मज्जासंस्थेस उत्तेजित करणारे आहे. अल्कहोलमध्ये काढलेले तेलविरहित अर्क गुंगी आणणारे तसेच वेदना शमन करणारे आहे. ही गुणधर्म वेखंडाची मानसिक रोगामध्ये उपयुक्तता सिध्द करतात. वेखंडाच्या मुळांची भुकटी कृमीउत्सर्जक असते.

मूलस्तंभाची जीवाणूविरोधीक्षमता सप्रयोग सिध्द झाली आहे. जवळ जवळ १.३ लाख रुपयाची २.८० क्विंटलस मूलस्तंभ १९७५-७६ साली निर्यात करण्यात आले.

## ४. अडुळसा

*(वसाका, अडातोडा, अडुसा)*

**अडातोडा झिलानिका** Medik. syn **अडातोडा व्हासिका** Nees

*कुल* : अर्कॅन्थेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *अडुळसा;*
*हिंदी* - *अडुसा, बन्स, वसिका;*
आसामी - *बहका, हरबक्श, तीशी;*
बंगाली - *बसाको;*
गुजराती - *अल्डुसो, आरडुसी;*
कानडी - *आडुसोगे;*
मल्याळी - *अटॅलोट्याकम;*
संस्कृत - *वसाका;*
तामिळ - *अडाडोराइ, आरथोराइ;*
तेलुगू - *अडसारमु.*
दिल्ली - *पिया-बन्स*

अडुळस्यास त्याच्या संस्कृत नावावरून वसाका म्हणूनपण ओळखतात.




रेखाचित्र क्र. २ अडुळसा (आडातोडा झिलानिका)

## वर्णन

सदाहरित, बहुशाखीय, उंच वा दाट क्षुप; पाने भालाकृती; फुले खुज्या व लहान कणिशात, कणिशवृंत पानापेक्षा लहान, कणिशावरील सहपत्र पानासारखे, ठळक शिरांचे; दलपुंज (दलांचे मंडल) पांढरे आतील भागात जांभळ्या रेशा; फळे बोंड प्रकारचे व चार बिया असलेले.

## वितरण

हे झाड भारतात मैदानी व डोंगराळ भागात सर्वत्र सापडते. वस्तीच्या जवळपास हे झाड आढळून येते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची ताजी व वाळवलेली पाने म्हणजेच अडुळसा औषध असते. पानांमध्ये 'व्हॅसिसिन्' नावाचे अॅल्कलॉइड् व तैलद्रव्य असते. कफविकारात प्रामुख्याने अडुळस्याचा उपयोग होतो. अडुळसा काढा, सरबत, किंवा पानांचा रस या स्वरूपात देण्यात येते. यामुळे कफ पातळ होऊन बाहेर पडण्यास मदत होते. याने दम्याच्या रोग्यास त्वरित आराम मिळतो. घशातील ग्रंथी यामुळे उत्तेजित होतात म्हणून हे कफद्वारक म्हणून काम करते. पण हे औषध जास्त प्रमाणात घेतल्याने वांती व चुरचुर होते आणि खाज सुटते. अगदी घशात केलेल्या प्रयोगांनी देखील अडुळस्याच्या उपयुक्ततेची खात्री पटलेली आहे.

## इतर उपयोग

या झाडाची पाने हिरवे खत तयार करण्यासाठी व त्यातील पिवळा रंग काढण्यासाठी वापरतात. पानांत अल्कलॉईड्स असल्याने बुरशी व कीटकांचे ते सहजासहजी भक्ष्य होत नाहीत. म्हणूनच त्यांचा उपयोग फळे गुंडाळण्यासाठी व साठवण्यासाठी केला जातो. पानांमधून दुर्गंधीयुक्त वास निघतो आणि तो पाने कुरतडल्यामुळे सगळीकडे पसरतो. म्हणून ओसाड जागा वापरात आणण्याआधी तिथे हे झाड लावण्यात येते.

# ५. बेल

**ईगल मारमेलॉस** (L.) Correa.

*कुल* : रूटेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *बेल;*
हिंदी - *बेल;*
आसामी - *बेल;*
बंगाली - *बेल;*
गुजराती - *बिली;*
मल्याळी - *विलवम;*
तेलुगू - *मारेडू.*

या झाडाच्या सर्वपरिचित भारतीय नावावरच 'बेल' हे व्यावहारिक नाव आधारित आहे.

## वर्णन

पानाच्या अक्षकोनातून निघणाऱ्या मजबूत काट्यांचा, मध्यम आकाराचा पानझाडी वृक्ष; पाने तीन किंवा पाच पर्णिकांसह; फुले हिरवट-पांढरी, सुगंधी, सुमारे २.५ से. मी. परीघ असलेली लहान लहान समूहांत; फळ ८-२० से. मी. परिघाचे, गोलाकार, हिरवे व पिकल्यावर राखाडी रंगाचे, कठीण सालीचे, नारंगी, गोड, सुगंधी गर असलेले.

## वितरण

भारताच्या डोंगराळ व सपाट मैदानी भागात हे झाड सर्वत्र आढळते. काही ठिकाणी याची लागवडही करण्यात येते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची पूर्णपणे किंवा अर्धवट पिकलेली फळे म्हणजेच बेल हे औषध होय.

मुख्यतः बेलफळातील म्युसिलेज आणि पेक्टिन या चिकट पदार्थांमुळे ते दीर्घकाळाच्या अतिसारावर आणि सामान्य अतिसारावर मूल्यवान समजल्या जाते. विशेषतः अतिसार आणि पोटातील मुरडा यावर याचा चांगला उपयोग होतो. अतिसारातून उठलेल्या रुग्णास त्याच्या आतड्यातील वेदना कमी करण्यासाठी फळांच्या गरापासून तयार केलेली सरबते वापरतात. कच्ची किंवा अर्धवट पिकलेली फळे भूक वाढवणारी व पचनास मदत करणारी असतात. बेलाची पाने, मुळे, फळे यांची

सूक्ष्मजीवविरोधी उपयुक्तता सिध्द झालेली आहे.

बस्तसं भागातील आदिवासी ताप उतरण्यासाठी म्हणून मुळांच्या सालीचा काढा वापरतात.

## इतर उपयोग

फळाच्या गरातील चिकट पदार्थ वार्निश (रंग), चिकटवण्याचे मिश्रण इत्यादीमध्ये डिंकासारखा वापरला जातो. कच्च्या फळांच्या सालीपासून पिवळा रंग निघतो.

# ६. कोष्ठ

*(जावा गलंगल, गलंगा मेजर)*

**ॲल्पीनिया गॅलांगा** (L.) Wild.

*कुल* : झिंजिबरेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *कोष्ठ, कुलिंजन*
हिंदी - *कुलिंजन, सुगंध- बच*
बंगाली - *कुलंजन*
कानडी - *डुंपरसमी*
संस्कृत - *कुलंजन*
तामिळ - *पेरारात्ताइ*

यास ग्रेटर गलंगलपण म्हणतात. हे झाड छोट्या गलंगलपेक्षा वेगळे आहे. या दोन्ही गलंगलच्या झाडांच्या जातीपण वेगवेगळ्या आहेत.

## वर्णन

दोन मीटर उंच औषधी; पाने लांब, अरुंद, वरचा पृष्ठभाग हिरवा, खालचा पृष्ठभाग फिकट हिरवा, काठ पांढुरके, मध्यशिरा ठळक; फुले सुमारे ३ से. मी. परिघाची, हिरवट-पांढरी, संयुक्त दाट समूहांत; दलपुंजाचे ओठ लाल रेघांनीयुक्त व पांढरे; फळ नारंगी - लाल, लहान चेरीच्या आकाराचे, मूलस्तंभ मंद सुगंधी

## वितरण

हे झाड निसर्गतः पश्चिम घाट व पूर्व हिमालयात सापडते; बऱ्याच ठिकाणी ते मुद्दाम लावण्यातही येते.

## औषधी गुणधर्म

या झाडाचे शुष्क मूलस्तंभ म्हणजेच कोष्ठ आहे. याचा मुलांच्या संधिवातावर आणि श्वसनाच्या विकारावर विशेषकरून वापर करतात. हे औषध दुर्गंधीनाशक, रोगजंतूनाशक शक्तिवर्धक असून पोटाच्या विकारावर उपयोगी समजले जाते. हे आल्यासारखे सुगंधी व उत्तेजक आहे. १९७०-७१ साली या झाडाचे पाच लाख रुपयांचे मूलस्तंभ भारताने आयात केले होते. मात्र ही आयात १९७७-७८ साली दोन लाख रुपयांपर्यंत घसरली.

## इतर जाती

*ॲल्पीनिया ऑफिसिनेरम्* ही या प्रजातीलच दुसरी महत्त्वाची जाती आहे. म्हणून हिला छोटा गलंगल म्हणतात. ही जाती मूलतः चीनमधील आहे. चिनी जातीच्या झाडांच्या मूलस्तंभांना तीव्र वास असतो व चव तीव्र असते. बंगाल व उत्तर भारतात हे झाड मोठ्या प्रमाणावर लावले जाते.

# ७. सातविण

(सप्तपर्णी, डीटा बार्क)

**आलस्टोनिया स्कोलारिस** (L.) R. Br. **आकृती ३**

*कुल* : ॲपोसायनेसाई

*भारतीय नावे* : मराठी - *सातविण, सैतान*
हिंदी - *छतिन*
बंगाली - *छैत्तिम*
कानडी - *मद्दाले*
मल्याळी - *पाला*
उडिया - *छतियाना*
संस्कृत - *सप्तपर्णी*
तामिळ - *पाला*
तेलुगू - *पालैग*
इंग्रजी नाव - *डेव्हिल्स ट्री*

'सप्तपर्णी' हे संस्कृत नाव एका मंडलात असणारी सात पाने यावरून प्रचलित झाले आहे.




रेखाचित्र क्र. ३ सातविण, सप्तपर्णी (आलस्टोनिया स्कोलारिस)

## वर्णन

कडू दुधाळरसाचा, मोठा २५ मीटर उंच, सदाहरित वृक्ष; साल गर्द पांढरी, खडबडीत; शाखा मंडलाकार, खोडाचा खालचा भाग फुगीर आणि वर आलेला; पाने कातडी पोत असलेली, लांब, एका मंडलात ४-७; फुले लहान, हिरवट पांढरी, मसाल्यासारखा वास असणारी आणि अनेक पुष्पसमूहात असणारी; फळे ३० ते ६० से. मी. लांब, अरुंद, सडपातळ, जोडीत लागलेली व दाट समूहात.

## वितरण

भारतातील ओलसर भागात हा वृक्ष सापडतो.

## औषधी गुणधर्म

या झाडाची शुष्क साल म्हणजे सातविण किंवा सप्तपर्णी औषध होय.

हे औषध दीर्घकाळाच्या अतिसारात आणि सामान्य अतिसारात रक्त पडणे यावर अप्रतिम समजण्यात येते. हे तापातही गुणकारी असते. या औषधाने ताप हळूहळू उतरतो. इतर औषधांप्रमाणे घाम व थकवा येत नाही. सातविण चर्मरोगांवरपण उपयुक्त आहे. हे औषध चेतातंतूना बधिर करते असे आढळून आलेले आहे, शिवाय रक्तदाबही कमी करते. या औषधाबाबतच्या काही प्रयोगांचा निष्कर्ष मात्र त्याच्या प्रतिजैविक आणि कार्यपध्दतीविषयक क्षमतेच्या विरुध्द जाणला आहे.

## इतर उपयोग

या झाडाचे लाकूड खोके, पेन्सिली व आगकाडी तयार करण्याच्या हलक्या प्रतीच्या लाकडी सामानासाठी वापरतात. जुन्याकाळी या झाडाच्या लाकडाचा उपयोग शाळेच्या पाट्या तयार करण्यासाठी होत असे यावरून या जातीचे 'स्कोलारिस' हे शास्त्रीय नाव आलेले आहे.

# ८. ओली किर्यत

(अँड्रोग्राफिस)

**अँड्रोग्राफिस पॅनिक्युलॅटा** (Burm F) Wall ex Nees

*कुल* : ॲकॅन्थेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *ओलीकिर्यत*
हिंदी - *किरयात, कुलुफनात*
बंगाली - *आलुई, कालमेघ*
गुजराती - *लिलम कर्यातु*
कानडी - *नेलबेवू*
मल्याळी - *नेलाव्हेपू*
संस्कृत - *किरात*
तामिळ - *निलाव्हेमू*
तेलुगू - *निलाव्हेमू*
(मध्य प्रदेश - *चिरेत्त*)

या झाडास कालमेघ म्हणूनपण ओळखल्या जाते.

ही सरळ-ताठ वाढणारी औषधी आहे; शाखा ४ कोन असलेल्या; पाने भालाकृती; फुले लहान सुट्या विखुरलेल्या शाखांवर विपुल प्रमाणात, गुलाबी रंगाची, सुमारे १ से. मी. लांब; फळ १.५ ते २ से. मी., बोंड प्रकारचे.

## वितरण

भारतात सगळीकडे उगवते-मुख्यतः सपाट प्रदेशात नियमित आढळते.

## औषधी गुणधर्म

या झाडांच्या मुळांव्यतिरिक्त जमिनीच्या वर वाढणाऱ्या सर्वच इतर भागांपासून ओली किर्यत औषध मिळते.

ओली किर्यत हे कडू शक्तिवर्धक आहे; ते तापावर, जंतावर, अतिसारावर, अशक्तपणावर आणि पोटात होणाऱ्या वायूवर उपयोगी आहे. याचा उपयोग लहान मुलांच्या यकृताच्या आणि पचनक्रियांच्या आजारावर होतो असेही सांगितलेले आहे.

बंगालमध्ये 'आलुई' नावाचे घरगुती औषध या झाडाच्या पानांपासून तयार करण्यात येते व लहान मुलांच्या पोटाच्या विकारांवर देण्यात येते.

या औषधाचा उपयोग सर्पदंशावरही होतो असे समजण्यात येत असे परंतु हे प्रयोगांनी सिध्द झालेले नाही. मुदतीच्या तापात व प्रतिजैविक औषध म्हणून याचा उपयोग अलिकडच्या प्रयोगांमुळे दिसून आला आहे. (बस्तरचे आदिवासी हे झाड मोहरी तेलात कुटुन खाज सुटली असता वापरतात.)

# ९. बदक वेल

*(इंडियन बर्थवर्ट, ॲरिस्टोलॉकिया)*

**ॲरिस्टोलॉकिया इंडिका** L.

*कुल* : ॲरिस्टोलॉकियेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *बदक वेल, सापासन*
हिंदी - *इशरमूल, ईश्वरी*
बंगाली - *इशुरमूल*
गुजराती - *आर्कमूल*
संस्कृत - *इश्वरीमूळ*
तामिळ - *उतमानीयलाये*
तेलुगू - *गुंटा गंजीरा*

यास इंग्रजीत इंडियन बर्थवर्टपण म्हणतात. ***ॲरिस्टोलॉकिया*** या शास्त्रीय नावानेपण त्यास जाणल्या जाते.

## वर्णन

क्षुप वल्ली, खोड खालच्या बाजूस (जमिनीकडे) टणक आणि वर मऊ असते; मूलस्तंभ काष्ठमय असतात; पाने विविध आकाराची आणि लांबीची, रेषाकृती, फार अरुंद, टोकाकडे अधोमुखअंडाकार होत जाणारी. फुले हिरवट-पांढरी, पानाच्या अक्षकोनातून निघणाऱ्या लहान समूहात असलेली, जांभळी, विशेषतः तुतारीसारखी; फळ सुमारे ५ से. मी. लांब, रुंदीपेक्षा लांबी अधिक, खालून वरच्या बाजूकडे ६ शिवणीतून उघडणारे (तडकणारे).

## वितरण

डोंगराच्या पायथ्याशी व सपाट प्रदेशात भारताच्या पूर्व व दक्षिण भागात सर्वत्र आढळते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या वाळवलेल्या मुळ्या व खोडे म्हणजेच सापासन (बदक वेल) औषध

आहे. हे औषध फक्त नियंत्रित व स्वल्प मात्रेतच उपयोगी आहे. याने पचनशक्तीत सुधारणा होते आणि स्त्रियांच्या मासिक पाळीमध्ये नियमितपणा येतो हे शक्तिवर्धकसुध्दा आहे. या औषधाचे प्रमाण जास्त झाल्यास पचनसंस्थेत व मूत्रपिंडात जळजळ होते, मळमळ व भयानक वांत्याही होतात. स्त्रियांमध्ये गर्भपात व इतर त्रास देखील संभवतात.

नियंत्रित प्रमाणात बदकवेल उत्तेजक म्हणून, आणि ताप उतरण्यावर वापरले जाते. याचा रक्तदाबावरही परिणाम होतो.

## इतर जाती

*ॲरिस्टोलॉकिया* या प्रजातीची दुसरी जाती *ॲरिस्टोलोकिया ब्रॅक्टीओलेटा* Lamk. (मराठी - *गिधन वेल, किडामारी*, गुजराती आणि हिंदी - *किरमर*, संस्कृत - *धूम्रपत्र*, कानडी - *कालागुडकी*, तामिळ, *गारीवेरे* - गुरपा आरकु) भारतात सगळीकडे विशेषकरून काळ्या कापसाच्या जमिनीत विपुल प्रमाणात आढळते आणि जंतावर व चिघळलेल्या जखमेवर उपयोगी आहे.

# १०. किरमनि ओवा

*(वर्मसीड, आर्टेमेसिया)*

**आर्टेमिसिया मारिटिमा** L.

*कुल* : ॲस्टरेसिई (कम्पोजिटीई)

*भारतीय नावे* : मराठी - *किरमनि ओवा*

हिंदी - *किरमनि आजवान, छुरी आजमद, किरमला*

काश्मिरी - *मुरनी*

पंजाबी - *फिल्लाउर*

संस्कृत - *गदाधर*

या औषधास सँटोनिना म्हणून देखील संबोधतात. आर्टेमिसिया या प्रजातीत असलेल्या झाडांच्या गुणकारी तत्त्वाशी संबधित आहे.

## वर्णन

सुमारे १ मीटर उंच बहुवर्षीय, बहुशाखीय, सुगंधी मजबूत क्षुप; पाने २-५ से. मी. लांब पांढुरक्या रंगाची, अनेक रेषाकृती भागात विभागलेली, वरची पाने साधी, रेषाकृती व अविभाजित; पुष्पमुंडके लहान आखूड कणिसामध्ये.

## वितरण

हे झाड काश्मिर ते कुमाऊपर्यंत २००० ते ३००० उंचीच्या प्रदेशात सापडते.

## औषधी गुणधर्म

कोवळी वाळवलेली पाने आणि पुष्पमुंडके औषध म्हणून वापरतात. हे औषध उन्हाळ्याच्या सुरवातीस किंवा शरद ऋतूच्या शेवटी जमा करण्यात यावे असे सांगण्यात येते. यावेळी पुष्पमुंडकाची वाढ पूर्णपणे झालेली नसते.

मुख्यतः कोवळ्या पानात व पुष्पमुंडकात असलेल्या 'सँटोनिनवर' या झाडाचे औषधी गुणधर्म आधारित आहेत. फुले अगदी उमलण्याच्या अगोदर त्यात 'सँटोनिनचे' प्रमाण जास्तीत जास्त असते व नंतर ते झपाट्याने कमी होते.

उदरातून कृमी मुख्यतः गोलकृमी व तंतुकृमी बाहेर घालवण्यासाठी याचा उपयोग होतो. याने कृमी मोठ्या आतड्यात ढकलल्या जातात व तिथून रेचकाच्या साह्याने बाहेर काढल्या जातात. हे औषध ताप, जलोदर आदीमध्ये उपयोगी असून उत्तेजक म्हणून देखील कार्य करते.

## इतर जाती

*आर्टेमेसिया* या प्रजातीच्या इतर अनेक जातीचा उपयोग औषधात करण्यात येतो. आर्टेमेसिया निलगिरिका (Cl.) Pamp (बंगाली आणि हिंदी - *नागडोना*, संस्कृत - *नागदमनी*, तामिळ - *मछिपत्रि*) ही जाती भारतात डोंगराळ भागात सापडते व हिचा उपयोग कृमी, दमा इत्यादींवर होतो.

***आर्टेमेसिया ॲबसिंथियम*** L. ***(अफसँथिंन)*** काश्मिरमध्ये आढळते. ती शक्तिवर्धक व पाचक म्हणून वापरली जाते. ज्या आर्टेमेसियाच्या जातीपासून 'सँटोनिन' मिळते अशा भारतीय जातींच्या वाढीव लागवडीची गरज वेळोवेळी व्यक्त करण्यात आली आहे. या औषधाची आमची मागणी १००० क्विंटल्सची आहे असा अंदाज करण्यात आला आहे.

आर्टेमेसियाच्या जाती हिमालयाच्या आतील भागात म्हणजे काश्मिर, पंजाब, हिमाचल प्रदेश आणि उत्तर प्रदेशाच्या २००० ते ३००० मीटर उंच प्रदेशात लावल्या जाऊ शकतात. हल्ली काश्मिरमध्ये वर्षभरात ५००० ते १०,००० क्विंटल्स आर्टेमेसियावर प्रक्रिया करण्यात येते.

# ११. बेलाडोना

**अट्रोपा अक्यूनिनॅटा** Royle ex Lindley

*कुल* : सोलॅनेसिई

*भारतीय नावे* : हिंदी - *अंगुरशफा, सागअंगुर*

काश्मिरी - *सागअंगुर*

बेलाडोना किंवा इंडियन बेलाडोना हे व्यावहारिक नाव अट्रोपाच्या बेलाडोना जातीच्या शास्त्रीय नावावरून घेण्यात आलेले आहे. ती युरोपमध्ये सापडते आणि भारतात तिची फक्त लागवड केली जाते.

## वर्णन

सुमारे ६० ते ९० से. मी. उंच सरळ वाढणारे, शाखीय, बहुवर्षीय झाड; पाने तपकिरी-हिरवट ७-१५ से. मी. लांब दोन्ही टोकास अरुंद; फुले एक किंवा दोन, पानांच्या अक्षकोनात, सुमारे २.५ से. मी. लांब घंटाकृती पिवळसर - तपकिरी; अनष्ठिल गोलाकार, सुमारे १.५ से. मी. परिघाची, जांभळी-काळी.

## वितरण

हे काश्मिरमध्ये २००० ते ३००० मीटर उंचीवर निसर्गतः मिळते व मुद्दाम लावलेले सुध्दा असते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली पाने व हवेतील इतर भाग म्हणजेच ***बेलाडोना*** औषध होय. या झाडातील अॅल्कलॉइड्चे प्रमाण फुले असतांना कमी आणि हिरवी अनष्ठिले लागल्यावर जास्त असते. अशारीतीने ते झाडाच्या वाढीच्या अवस्थेवर अवलंबून असते.

घाम, लाळ आणि पोटातील ग्रंथींचा स्राव या झाडाच्या हवेतील भागापासून आणि पानांपासून मिळणाऱ्या औषधाने कमी होतो. अधून मधून होणाऱ्या पोटशूळावर हे उत्तम औषध आहे, तसेच फिट्स येण्याच्या लक्षणावर उपयोगी आहे. हे दमा व डांग्या खोकल्यावरही उपयोगी आहे.

या झाडाच्या मुळांपासून काढलेल्या औषधाचे गुणधर्म पाने, फांद्यात असलेल्या औषधासारखेच असतात. तथापि मुळांमध्ये काही विशिष्ट विषारी द्रव्य असल्याचे समजण्यात येते आणि म्हणून ते सांधेदुखी, न्यूराल्जिया, सूज येणे या सारख्या रोगांत बाहेरून लावण्याच्या औषधांत वापरले जाते.

या झाडाची जवळ जवळ ६० क्विंटल्स पाने आणि मुळ्या १९७७-७८ दरम्यान र्यात करण्यात आली होती.

## इतर जाती

***अट्रोपा बेलाडोना*** L. (डेड्ली नाईट्शेड) ही या प्रजातीची दुसरी महत्त्वाची जाती आहे. ती मूळची युरोपातील असून मुख्यतः भारताच्या डोंगराळ भागात लावलेली असते याची मुळे ***(बेलाडोना रॅडिक्स)*** आणि पाने ***(बेलाडोना फोलियम)*** औषधी आहेत. त्यांचा वापर ठराविक रोगांवर व औषधाच्या प्रमाणावर अवलंबून आहे. ते मुख्यतः शक्तिवर्धक, फिटस थांबवण्यासाठी व उष्नाशक म्हणून महत्त्वाचे आहे. यात डोळ्यांची



रेखाचित्र क्र. ४ लिंब (अझडिरेक्टा इंडिका)

बुबुळे प्रसरण करण्याचा गुणधर्म आहे. डोळे तपासण्याच्यावेळी डोळ्यात टाकायचे पातळ औषध किंवा मलम यात ॲट्रोपिन हे औषध वापरले जाते. तसेच इतर डोळ्यांच्या औषधोपचारातपण त्याचा वापर केला जातो. काही ठराविक प्रकारच्या विषबाधेवरील उपचारात याचा विषबाधाविरोधी औषध म्हणून उपयोग होतो.

१९७०-७१ मध्ये या झाड १ लाख रुपयाचे ॲल्कालॉईड आयात करण्यात आले.

# १२. लिंब

**अझाडिरेक्टा इंडिका** A. Juss. **आकृती ४**

*कुल* : मेलियेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *नीम, लिंब*
हिंदी - *नीम*
बंगाली - *नीम*
गुजराती - *लिंबो*
कानडी - *बेवू*
मल्याळी - *वेप*
उडिया - *नीम*
तामिळ - *व्हेप*
तेलुगू - *व्हेपा*

सर्वसामान्य भारतीय नावावरून लिंब हे व्यावहारिक नाव प्रचारात आलेले आहे.

## वर्णन

लिंब भारतात सर्वपरिचित असा वृक्ष आहे. या वृक्षास संयुक्त पिच्छाकृती पाने असतात म्हणजेच त्याची पाने लहान लहान अनेक भागात विभागलेली असतात. त्यास पर्णिका म्हणतात; प्रत्येक पर्णिका सर्वसाधारण पानासारखी दिसते; फुले लहान, पांढरी, अक्षकोनातून निघालेल्या आखूड समूहात असतात; फळे १.२ - १.८ से. मी. लांब. हिरवी किंवा पिवळी, एकच बीज असलेली.

## वितरण

हा वृक्ष दक्षिण भारतात निसर्गतः वाढतो आणि सगळीकडे गावाजवळ, रस्त्याच्या बाजूला लावलेला असतो.

## औषधी गुणधर्म

वाळवलेल्या झाडाची साल, पाने आणि मुळांची साल याचा समावेश औषधात होतो. साल हे एक कडू शक्तिवर्धक असून मुदतीच्या रोगावर उत्तम औषध आहे. म्हणजेच तापात उपयोगी आहे, मलेरियासारखा वारंवार येणारा ताप याने थांबतो. शिवाय चर्मरोगावरही याचा उपयोग होतो.

कडू पाने चर्मरोगावर आणि गळूवर मोठ्या प्रमाणात बाहेरून लावण्यासाठी वापरण्यात येतात. ती काढ्याच्या स्वरूपातसुध्दा घेतली जातात. या झाडाची पाने आणि मुळे यांची चर्मरोगातील जिवाणूविरोधी क्षमता प्रयोगाद्वारे सिध्द करण्यात आलेली आहे.

## इतर उपयोग

कडू लिंबाचे लाकूड टिकावू असल्यामुळे घरबांधणीसाठी, शेती औजारासाठी आणि सुतारकामासाठी वापरण्यात येते. सालीतून डिंक आणि पेंड यासुध्दा महत्त्वाच्या वस्तू आहेत. कपड्यांचे किटकांपासून संरक्षण करण्यासाठी लिंबाची वाळवलेली पाने त्यात ठेवतात.

# १३. घोळ (जलब्राम्ही)

*(बाकोपा)*

बाकोपा मोनिएरी (l.) Wettest. syn. ***हरपेस्टिस मोनिएरा*** (L.) H.B.K. ***मोनिएरा क्यूनिफोलिया Mich.***

*कुल* : स्क्रॉफ्युलारियेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *घोळ, जलब्राम्ही*
हिंदी - *ब्राम्ही, सफेद छामनी*
गुजराती - *जलब्राम्ही, जल नेवरी*
मल्याळी - *बारना, निरब्राम्ही*
संस्कृत - *सौम्यलता*
तामिळ - *सांब्राने इलाय्ये*
तेलुगू - *सांब्राने आखलू*
इंग्रजी नाव : थाईम् - *लीव्हड ग्रॅशिओला.*

या झाडास ब्राम्हीसुध्दा म्हणतात. परंतु ही खरी भृंगराज ब्राम्ही नव्हे. भाजीचा घोळ या औषधी घोळापेक्षा भिन्न असतो. या झाडाच्या शास्त्रीय नावावरून यास बाकोपाही म्हणतात.

## वर्णन

ही औषधी जमिनीवर पसरते आणि तिची खोडे आणि पाने जाड म्हणजे रसदार असतात; खोडाच्या पेऱ्यापासूनसुध्दा मुळे निघतात; फुले पानांच्या अक्षकोनातून निघतात व आखूड देठावर असतात; पाच निदलांपैकी एक निदल मोठे असते. दलपुंज सुमारे १ से. मी. परिघाचे असून निळसर पांढऱ्या रंगाचे असते.

## वितरण

शेतातील पाणी देण्याच्या नाल्यांजवळ, विहिरीजवळ बागायती जमिनीत इत्यादी ओल्या व ओलसर जागी ही औषधी भारतात सर्वत्र सापडते.

## औषधी गुणधर्म

ब्राम्हीचे संपूर्ण झाडच औषधी आहे. ते मज्जासाठी एक मूल्यवान शक्तिवर्धक आहे आणि ज्यात आचके येतात किंवा बेशुध्दअवस्था येते त्या मज्जासंस्थेच्या विविध रोगांसाठी, मानसिक रोगात, बध्दकोष्ठतेत आणि लघवी होण्यासाठी वापरण्यात येते. तान्ह्या मुलांच्या दम्यात (ब्रॉंकाईटिस) याच्या पानाचा रस देण्यात येतो; यात वमनकारक व रेचक गुण असल्यामुळे रोग्यास आराम वाटतो. पानाचा रस आणि रॉकेलचे मिश्रण संधिवातावर लावण्यात येते. उकळलेल्या झाडापासून तयार केलेले पोटिस कफामुळे आजारी असलेल्या मुलांच्या छातीवर ठेवतात. हे झाड रक्त शुध्द करणारे असल्याचे समजण्यात येते.

या झाडाच्या अल्कोहोलिक अर्काचा गुंगी आणणारा परिणाम प्रायोगिक प्राण्यांवर यशस्वीपणे सिध्द करण्यात आला आहे. या झाडातील ब्राम्हीन नावाचे अ‍ॅल्कलॉईड हृदयासाठी शक्तिवर्धक आहे व हृदयास शक्ती आणि नियमितपणा प्रदान करते.

# १४. दारूहळद

## *(बरबेरिस)*

**बरबेरिस ॲरिस्टॅटा** DC आकृती ५

*कुल* : बरबेरिडेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *दारूहळद*
हिंदी - *रसौत, दारूहलदी, किनगोरा, किलमोरा*
बंगाली - *दारूहालदी*
काश्मिरी - *रसवत*
मल्याळी - *मारा दारिसिना*
पंजाबी - *काशमूल*
संस्कृत - *दारू हरिद्र*
तामिळ - *माडामंजल*

### वर्णन

मोठे काटेरी क्षुप; काष्ठ पिवळे; शाखा पांढुरक्या किंवा फिकट करड्या रंगाच्या; पाने विशेष प्रकारची शाखीय किंवा अशाखीय कंटकाच्या अक्षकोनातून निघणारी, कातडी पोताची, कडा बहुतेक टोकदार दातेरी, शिरा बारीक; फुले पिवळी छोट्या समूहात; फळ अंडाकृती, निळसर जांभळे; बिया थोड्या.

### वितरण

हे झाड हिमालयात २००० ते ३००० मीटर उंचीवर सापडते; ते दक्षिण भारतात निलगिरीच्या डोंगरात सुध्दा उगवते.

### औषधी गुणधर्म

या झाडाच्या किंवा या प्रजातीतील जवळच्या *बरबेरिस एशियाटिका* Roxb आणि *बरबेरिस लायसियम* Royle म्हणतात. या औषधातील मुख्य घटक म्हणजे 'बरबेरिन' (आकृती ६) या जातीच्या मुळ्यांच्या भुकटीस *'बरबेरिस'* ॲल्कलॉइड आहे. मुळ्यांची साल, मुळे आणि खोडाचा खालचा भाग पाण्यात उकळला जातो, त्यास नंतर गाळून अर्धवट घट्ट गोळा होईपर्यंत बाष्पीभूत करण्यात येते. या अर्धवट गोळ्यास 'रसौत' असे म्हणतात. रसौत पाण्यात विरघळते.




रेखाचित्र क्र. ५ दारू हळद (बरबेरिस ॲरिस्टॅटा)




रेखाचित्र क्र. ६ दारू हळद (बरबेरिस् लायसियम)

हे लोणी व तुरटीत मिसळून किंवा आफू व मोसंबीच्या रसात मिसळून डोळे येण्यावर किंवा डोळ्यांच्या इतर आजारांवर बाहेरून पापण्यांवर लावण्यात येते. क्षत बरे करण्यासाठी रसौतचा वापर प्रयोगाद्वारे दाखवण्यात आलेला आहे. हे गळूच्या काठावरून इंजेक्शनद्वारेसुध्दा आत सोडण्यात येते.

रसौत ज्वरनाशक, सौम्य रेचक, आणि शक्तिवर्धक म्हणून वापरले जाते. पोटाच्या विकारात ते उपयोगी आहे, आणि सशांवर केलेल्या प्रयोगांनी त्याच्या कॉलरा व अतिसारातील वापराची खात्री पटलेली आहे.

हे औषध हिवतापातपण वापरत असत पण या आजारात ते फारसे गुणकारी नसल्याचे सिध्द झाले आहे; तथापि ते हिवतापाची सुरवात समजण्यास मदत करते.

श्वसन व हृदय यांची गती या औषधाने मंदावते हे सुध्दा प्रयोगाद्वारे दाखवण्यात आले आहे. या औषधात क्षयविरोधी गुणधर्म असल्याचे सांगण्यात येते.

*बरबेरिस ॲरिस्टॅटा* या जातीच्या मुळ्या आणि खोडांपासून पिवळा रंग मिळतो; याचा कातडी कमवण्यासाठी व रंगवण्यासाठी वापर होतो. वर्षात सुमारे २००० ते ३००० क्विंटल्स बर्बेरिस्ची मुळे निर्यात करण्यात येतात.

# १५. तांबडी वसू

*(पुनर्नवा, बोएराव्हिया)*

**बोएराव्हिया डिफ्युजा** L.

*कुल* : निक्टॅजिनेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *तांबडी वसू*
हिंदी - *पुनर्नवा, सांथी, बिशखोप्रा, संत, सुरवरि.*
बंगाली - *पुनर्नबा*
गुजराती - *मोटो सातोडो, नाहनो वसेॅरो*
संस्कृत - *रक्तकंद, पुनर्नवा*
तामिळ - *मुक्करातेई*
तेलुगू - *आतकी, आतिक, मामिदी*
(मध्य प्रदेश - *पथ्थरचट्टा, खोरिया)*

*इंग्रजी नाव* : हार्स-पर्सलेन, हॉगविड

या झाडाचे पुनर्नवा हे नाव संस्कृत नावावरून घेण्यात आलेले आहे. यास जुन्या लिखाणात सुथघ्न म्हणजे जलोदर नष्ट करणारा म्हटले आहे.

### वर्णन

बहुशाखीय औषधी, जमिनीवर सरपटत किंवा अर्धवट सरळ वाढणारी, प्रत्येक पेऱ्यावर दोन लहान मोठी पाने, पानाच्या तळाचा भाग हृदयाकृती; पानाचा खालचा पृष्ठभाग पांढुरका, वरचा हिरवा; फुले फार लहान, तांबूस-आरक्त रंगाची, अक्षकोनातून निघणाऱ्या लांब शाखांवर, छोट्या समूहात; फळ पंचधारी, ग्रंथीयुक्त.

### वितरण

भारतात सर्व भागात आढळते.

### औषधी गुणधर्म

संपूर्ण झाड आणि विशेषतः मुळ्या, पाने आणि बिया म्हणजे तांबडी वसू किंवा पुनर्नवा औषध आहे.

या झाडात 'पुनर्नव्हिन' नावाचे अॅल्कलॉईड असते. या औषधाचा मुख्य उपयोग जलोदर, कावीळ, गणोरिया या रोगांत विशेष मूत्रविरेचक म्हणून होतो. ते रेचकही आहे. हे दम्यात मध्यम प्रमाणात देण्यात येते. मोठ्या प्रमाणात घेतल्यास वांत्या होतात.

याचा मूत्रविरेचक गुणधर्म प्राण्यांवर केलेल्या प्रयोगांनी सिध्द झाला आहे.

## १६. पळस

*(पलाश, फ्लेम ऑफ दि फॉरेस्ट)*

**ब्यूटिया मोनोस्पर्मा** (Lamk.) Taub. syn. *ब्युटिया मोनोस्पर्मा*

*कुल* : प्यापिलिऑनिसीई

*भारतीय नावे* : मराठी - *पळस*

हिंदी - *पलाश, टेसू, ढाक*

बंगाली - *पलास*

गुजराती - *खाकरो*

संस्कृत - *पलश*

तामिळ - *पलसु*

तेलुगू - *पलसामु*

उर्दू - *पलश पापडा*

(अजमेर - मारवाड - *चौरा*)

पळस आणि फ्लेम ऑफ दी फॉरेस्ट ही नावे अनुक्रमे स्थानिक भारतीय व इंग्रजी नावावरून घेण्यात आलेली आहेत.

## वर्णन

पळस हे भारतात सर्वांना परिचित झाड आहे. त्याची शेंदरी-नारंगी रंगाची फुले इतक्या मोठ्या प्रमाणात फुलतात की त्यामुळे त्यास 'फ्लेम ऑफ दी फॉरेस्ट' हे नाव योग्यरित्या लागू पडते. या मध्यम आकाराच्या झाडास संयुक्त पाने असतात, प्रत्येक पानास तीन पर्णिका असतात. पर्णिकांच्या खालील पृष्ठभागावर ठळक शिरा असून मऊ रेशमी केस असतात; पाने हेमंत ऋतुत गळून पडतात. सुमारे फेब्रुवारी ते मार्च महिन्यात याच्या पर्णरहित फांद्यांवर लहान लहान गुच्छांमध्ये (दाट) फुले लागतात याने झाड नारंगी रंगात माखून निघाल्याचे दिसते. फळ चपट्या शिंब प्रकारात मोडते व त्यात एकच बी असते. *मोनोस्पर्मा* हे नाव फळातील असलेल्या एका बीजाशी निगडित आहे.

## वितरण

हे झाड भारतात सगळीकडे, मुख्यतः मध्य व पश्चिम भारतात, मिश्रित किंवा पानझडी जंगलामध्ये सापडते. सपाट भाग व डोंगराच्या पायथ्याशी सामान्यपणे दिसते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या बिया लाल रंगाचा डिंक ज्यास 'बेंगॉलकिनी' किंवा 'ब्युटिया गम' म्हणतात औषधी आहेत.

डिंक टॅनिनयुक्त असल्याने अतिसारावर महत्त्वाचे औषध आहे.

बिया कृमिविरोधी असल्यामुळे गोलकृमी व पट्टकृमींच्या औषधोपचारात वापरण्यात येतात. त्यांचा गोलकृमीवरचा उपयुक्तपणा सप्रयोग सिध्द झाला आहे. पळसाच्या बिया सँटोनिनाच्या ऐवजी वापरण्यास योग्य आहेत. त्या लिंबाच्या रसात कुटून जांघांतील चर्मरोगावर लेपणासाठी वापरण्यात येतात. तसेच नायट्यावरपण उपयोगी आहेत. रक्तदाबावर मुळांच्या सालीने काहीतरी क्रिया होते असे दिसून आले आहे.

## इतर उपयोग

हे झाड लाखेच्या कीटकाचे राहाण्याचे ठिकाण असल्याने महत्त्वाचे मानले जाते. फुलांपासून पिवळा रंग निघतो. याचे लाकूड पाण्याखाली बऱ्याच काळापर्यंत चांगले टिकते आणि म्हणूनच विहिरींच्या कठड्यांसाठी व पाण्याच्या मोटेसाठी वापरण्यात येते. ते किरकोळ बांधकामात आणि इंधन म्हणूनसुध्दा वापरण्यात येते. जेवणासाठी पत्रावळी व डवणे बनवण्यासाठी पळसाची पाने मोठ्या प्रमाणावर वापरली जातात.

## इतर जाती

*ब्यूटिया सुपर्बा* Roxb. (हिंदी - पलाश लता) भारतात जवळ जवळ सगळीकडे वाढणारी ही टणक व मजबूत अशी काष्ठवल्लरी आहे. उष्णतेने मुलांच्या अंगावर येणाऱ्या फोडांवर हिच्या पानांचा रस उपयोगी आहे.

# १७. बहावा

*(अमलतास, इंडियन लॅबरन्‌म.)*

**कॅशिया फिस्ट्यूला** **आकृती ७**

*कुल* : सीसालपिनियेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *बहावा, जांब*

हिंदी - *आमलतास, किलवली, किरला, सिनार*

आसामी - *सोनारू*

बंगाली - *सोनाली, बंदरलाठी*

गुजराती - *गारमला*

कानडी - *काक्के*

मल्याळी - *क्रीतमालम्‌*

संस्कृत - *सुवर्णक*

तामिळ - *कोन्नी, अलास*

तेलुगू - *रेळा*

या झाडाचे फळ विडी (चिलिम) सारखे दिसते व म्हणून यास *फिस्ट्यूला* हे शास्त्रीय नाव देण्यात आले आहे.

## वर्णन

हे झाड मध्यम आकाराचे असून त्यास संयुक्त पाने आणि चमकदार गर्द हिरव्या रंगाच्या मोठ्या पर्णिका असतात; फुले चटकदार पिवळ्या रंगाची, लांब लटकणाऱ्या पुष्पविन्यासात लागतात; फळे काळ्या किंवा गर्द तपकिरी रंगाची ५० - ६० से. मी. लांब नळकांड्याच्या आकाराची असतात. फुले आणि फळे लागल्यावर जंगलात हे झाड लांबूनसुध्दा ठळकपणे नजरेत भरते. उन्हाळ्याच्या सुरवातीस (मार्च-मे) या वृक्षाची सर्व पाने गळून पडतात आणि ते नखशिखांत फुलते.

## वितरण

समुद्रसपाटीपासून सुमारे १५०० मीटर उंचीवर भारतात सगळीकडे हा वृक्ष सापडतो. रस्त्याच्या कडेला आणि बागेत लावण्यासाठी याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या सर्वच अवयवांमध्ये औषधी गुणधर्म आहेत तरी पण फळे अतिमहत्त्वाची असल्याने त्यांचा समावेश भारतीय औषध कोशमध्ये करण्यात आला आहे. या फळाचा गर *कॅशिया पल्प* म्हणून ओळखला जातो व ते सर्वज्ञात रेचक आहे. जास्त प्रमाणात घेतल्याने हगवण, मळमळ व पोटात मुरडा येतो. ते नुसतेच न वापरता सेनाच्या (सेना अंन्गुस्टिफोलिया) किंवा इतर संबंधित झाडाच्या पानाबरोबर मिश्रित स्वरूपात वापरले जाते.

## इतर उपयोग

या झाडाची साल सुमरी म्हणून ओळखली जाते, त्यात विपुल प्रमाणात टॅनिन असतात. या झाडाचे लाकूड मजबूत आणि टणक असल्याने घरबांधणी, पुलासाठी आणि शेतीऔजारासाठी योग्य आहे.

## इतर जाती

*कॅशिया अंगुस्टिफोलिया* Vahl हे अरेबिया व सामालि ब्रेटावरचे लहान क्षुप आहे आणि याची दक्षिण भारतात यशस्वी लागवड होते. याची पाने व फळे जुलाबाची औषधं आहेत आणि जुन्या बध्दकोष्ठतेत उपयोगी आहेत असेही दिसून आले आहे.

अंगावर पाजणाऱ्या स्त्रियांनी हे औषध घेतल्यास त्यांच्या दुधाने सुध्दा जुलाब होतात.

कॅशियाच्या इतर जातीचे औषधी उपयोग मर्यादित स्वरूपांचे आहेत.

१९७७-७८ साली १.२ कोटी रुपये किंमतीची बहावाची पाने व फुले निर्यात करण्यात आली.

# १८. सदाफुली

**कॅथरॅन्थस् रोझिअस** (L.) G. Don. syn. **व्हिंका रोझिया** (L.) **लाकनेरा रोझिया** (L) Richb.

*कुल :* ॲपोसायनेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *सदाफुली*
हिंदी - *सदाबहार*
बंगाली - *नयनतारा, गुल फेरिंगी*
मल्याळी - *उशमालरी*
उडिया - *आईस्‌कती*
तामिळ - *सुदुकडु, मल्लिकई*
तेलुगू - *बिल्लागनेर*
(पंजाबी - रत्तनजोत)

## वर्णन

एक मीटर सरळ वाढणारी औषधी; पाने अंडाकृती, संमुख; फुले अक्षकोनात दोन किंवा तीनच्या समूहात; दलपुंज पांढरी किंवा गुलाबी असलेले, एका जातीत दलपुंज पांढरे किंवा खालच्या भागावर गुलाबी छटा असलेले; फळे पुष्कळ बिया असलेली पुटक प्रकारची.

## वितरण

मूलतः हे झाड मादागास्करचे आहे, पण दोन्ही गोलार्धात, उष्णकटिबंधात नैसर्गिक अवस्थेत सापडते. ते लावले जाते व तेथूनच नैसर्गिक अवस्थेत उगवायला सुरवात होते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची मुळे औषधी असतात. आधी या औषधात पोटदुखी निर्माण करणारे आणि विषारी गुणधर्म असल्याचे समजण्यात येत असे, परंतु यात अलीकडे मौल्यवान ॲल्कलॉईडचे प्रमाण दिसून आले आहे. या ॲल्कलॉईडचे साम्य सर्पगंधा जातीच्या झाडाशी दाखवण्यात येते. सदाफुलीच्या मुळात ॲजमॉलिसिन आणि सेरपेंटाइन सर्पगंधाच्या मुळापेक्षाही जास्त प्रमाणात आहे. यात रेसरपाइनपण आहे. त्यात दुखण्याचा त्रास कमी करण्याचा, रक्तदाब कमी करण्याचे गुणधर्म आहेत.

प्राण्यांवर केलेल्या प्रयोगांनी असे दाखवून दिले आहे की सदाफुलीच्या ठराविक प्रकारच्या अर्काचा रक्ताच्या कर्करोगावर उपयोग होतो.

## इतर उपयोग

हे बागेतील सुंदर झाड आहे व वर्षभर फुलत असल्याने यास सदाबहार म्हणतात. कुठल्याही वातावरणात फुलते म्हणून लोकप्रिय शोभेचे झाड आहे.

दरवर्षी या झाडाची सुमारे ६००० क्विंटल्स मुळ्या भारतातून निर्यात केली जातात.

## इतर जाती

*कॅथॅरॅन्थस प्यूसिलस G. Don. (Syn व्हिंका प्युसिला Murr., लॉकनेरा प्यूसिला (Murr) K. Schum.* (संस्कृत - *शंखफुलि*, तामिळ - *मिलगयि पुंडु)* हे एक तण म्हणून उगवते व कमरेतील उसण किंवा कटिवातात उपयोगी असल्याचे सांगण्यात येते.

# १९. ब्राम्ही

*(इंडियन पेनिवर्ट)*

***सेंटेला एशियाटिका*** (L.) Urban syn. **हायड्रोकोटाईल एशियाटिका** L.

*कुल :* अपेअेसीई = (अंबलिफेरी)

*भारतीय नावे :* मराठी - *ब्राम्ही*

हिंदी - *ब्रीम्ही, ब्राम्हणदुकी, दुधब्राम्हणी*

बंगाली - *थांकुरिया*

गुजराती - *बारमि*

कानडी - *व्होंडेलागा*

पंजाबी - *ब्राम्ही बुटि*

संस्कृत - *मंडुकपर्णी*

तामिळ - *व्होलारेइ इलै*

तेलुगू - *बोकुडु, निले, टांगरू, आखलु*

(नागा हिल्स, आसाम - अधिन्या; सिलचर - *टुनिमनकोनि;*
सिक्किम - गोरप्रि.)

या झाडाची पाने बेडकाच्या पंज्यासारखी दिसतात म्हणून संस्कृतमध्ये यास 'मंडुकपर्णी' म्हणतात.

## वर्णन

हे जमिनीवर रांगणारे झाड आहे. त्याच्या रांगणाऱ्या पेरापासून मुळे निघतात; पाने लहान २-४ से. मी. परिघ असलेली, काही वेळा गोलाकार किंवा वृक्काकार, काठ दातेरी. फुले लहान गुलाबी-लाल, तीन ते सहा एका समूहात; फळे लहान, बार्लीच्या दाण्यासारखी, ७ - ९ रेषा असलेली.

## वितरण

भारतात ओलसर जागेत सर्वत्र आढळते. ओलसर नदी, नाल्याच्या काठावर व बागायती शेतात आणि हिरवळीत वगैरे ठिकाणी उगवते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली खोडे व पाने म्हणजेच ब्राम्ही औषध आहे. मुळे आणि बियासुध्दा औषधी म्हणून वापरली जातात.

पूर्ण झाड किंवा पाने उकळून तयार केलेला काढा महारोगावर वापरला जातो.

या झाडात 'एशियाटीकोसाईड' असते. ते महारोगाच्या औषधोपचारात गुणकारी आहे. कातडी, केस आणि नखे शिघ्र वाढवण्याच्या गुणधर्माची प्राण्यांवर केलेल्या प्रयोगांनी खात्री पटली आहे.

झाड विशिष्ट प्रकारच्या क्षय रोगातही उपयोगी असल्याचे सांगण्यात येते. तसेच मेंदूसाठी शक्तिवर्धक म्हणूनही वापरतात.

# २०. काळे जिरे

*(सोमराज, सेंट्राथेरम)*

**सेंट्राथेरम अँट्हेलमिंटिकम** (Willd.) Kuntz. syn. **व्हर्नोनिया अँट्हेलमिंटिका** Willd.

*कुल :* अॅस्टरेसीई ( = कम्पोझिटी)

*भारतीय नावे :* मराठी - ***काळे जिरे***
हिंदी - *सोमराज, सोमराजी, बनजिरा*
बंगाली - *सोमराज*
गुजराती - *कालिजिरी*
कानडी - *कडू जिरगे*
मल्याळी - *कट्टूजिरकम*
पंजाबी - *सोमराज*
संस्कृत - *सोमराजी*
तामिळ - *कट्टक्षिरागम*
तेलुगू - *अडविजिलकडा*
उर्दू - *जंगली जिरी*
(घारवाल - काळा जिरा)

यास सेंट्राथेरम व सोमराज सुध्दा म्हणतात. ही नावे शास्त्रीय संस्कृत नावावरून आलेली आहेत. *अँट्हेलमिंटकम* हा शास्त्रीय नावातील शब्द कृमीविरोधी उपयोगाशी संबधित आहे.

## वर्णन

सरळ वाढणारे औषधी; खोडे आणि पानांवर बारीक केसांचे अच्छादन; पाने ६-१० से. मी. लांब, काठ दातेरी, खालील भाग निमुळता होत जाऊन पर्णवृंत तयार करतो; फुलांच्या मुंडकाचे परिघ १.५ - २.५ से. मी. लहान समूहात, प्रत्येक मुंडकात ३०-४० लहान, जांभळट फुले असतात; फळांना शास्त्रीय भाषेत चर्मिलक म्हणतात त्या ४.५ -६ मि. मी. लांब नळकांड्याच्या आकाराचे असून त्यावर केस असतात, चर्मिलकास १० अरुंद, उभ्या, उठावदार रांगा असतात, यास वर डोक्यावर केसांचा पुंजका असून तो लालसर तपकिरी असतो.

### वितरण

हे झाड समुद्रसपाटीपासून १५०० मीटर उंचीवर भारतात सर्वत्र आढळते आणि ओसाड जागेवर विपुल प्रमाणात उगवते.

### औषधी गुणधर्म

या झाडाचे औषध म्हणजे शक्य तितक्या ताज्या किंवा वाळवलेल्या बिया आहेत.

झाडाच्या नावानुसार जंतनाशक स्वरूपाचे जालिम औषध आहे. नारूच्या जंतावरही याचा उपयोग होतो.

जुन्या लिखाणावरून हे पूतिनाशक, उत्तेजक आणि लघवी सुटण्यास मदत करणारे आहे. परंतु प्रयोगाअंती वरीलप्रमाणे कुठलाही गुण यात दिसून येत नाही. दवाखान्यांमध्ये याचा नारूच्या रोगात खात्रीलायक गुण दिसून आला आहे.

## २१. इपेकॅक

*(इपेकॉकूआन्हा)*

**सेफीलिस् इपेकॉकूआन्हा** (Brot.) A. Rich.

*कुल* : रूबिअेसीई

### वर्णन

सुमारे १० ते २० से. मी. लहान, रांगणारी औषधी. मुळे जमिनीच्या समांतर पसरणारी, सडपातळ, पक्व मुळ्या गाठाळ आणि समूहात; पाने संमुख पर्णविन्यासात, त्याचे आग्र टोकदार व कडा अखंड; फुले पांढरी लहान, लहान समूहात.

### वितरण

हे झाड मूलतः दक्षिण अमेरिकेतील ब्राझिल येथील असून भारतात आसाम व बंगालमध्ये तसेच दक्षिण भारतात प्रायोगिक तत्त्वावर लावले जाते.

### औषधी गुणधर्म

या झाडाच्या वलयांकित गाठाळ मुळ्यांतून व मूलक्षोडातून इपेकॅक नावाचे औषध मिळते त्यात एमेटिन व सेफेलिन नावाचे ॲल्कलॉईड असतात. हे औषध आमांशावर आणि भूक न लागण्याच्या विकारावर उपयोगी आहे. जास्त प्रमाणात घेतल्याने याने वांत्या होतात व हा गुणधर्म कफनाशकासाठी वापरला जातो. ते स्वेदक

सुध्दा आहे, याच्या सेवनाने घाम येतो. इपेकॅकची जगात सर्वात मोठी लागवड पश्चिम बंगालमध्ये करण्यात आलेली आहे. भारतातील इपेकॅकची मागणी यातूनच पूर्ण करण्यात येते. पश्चिम बंगालमधील इपेकॅकच्या लागवडीतून, वाळवलेल्या मुळ्यांचे ५०० क्विंटलूस लक्ष सांगण्यात येते. इपेकॅकच्या मुळ्याची निर्यातीची मागणी पाहता लागवडीचे क्षेत्र वाढवण्याची शिफारस करण्यात आली आहे.

# २२. सिंकोना

**सिंकोना जाती**

*कुल :* रूबिअेसीई

भारतीय नावे : कुनम हे सर्वपरिचित स्थानिक नाव 'क्विनाइन' या नावावरून घेण्यात आलेले आहे. ते *सिंकोना* झाडाच्या सालीतील क्रियाशील तत्त्व आहे.

*सिंकोना* ही प्रजाती देशी नसून तिच्या कुठल्याही जाती भारतात नैसर्गिक अवस्थेत सापडत नाहीत. तथापि अनेक जाती भारतात लागवडीखाली आहेत. त्यापैकी ४ महत्त्वाच्या आहेत. त्या अशा

१. *सिंकोना कॅलिसाया Wedd.* (व्यावहारिक नाव : *कॅलिसाया बार्क, पेरूव्हियन साल*) हे सिक्कीम व निलगिरीत लावलेले असते.

२. *सिंकोना लेड्जेरियाना Moens.* (व्यावहारिक नाव : *लेजर बार्क* ) हे बंगाल, आसाम व दक्षिण भारतात लागवडीखाली आहे. हेच भारतातील सर्वसाधारण *सिंकोना* होय.

३ *सिंकोना ऑफिसिनॅलिस L.*(व्यावहारिक नाव : क्राउन बार्क, लोक्सा बार्क) हे निलगिरीत लावण्यात येते.

४. *सिंकोना सक्सिरूब्रा Pav. ex Klotzsch.* (व्यावहारिक नाव : रेड *बार्क* ) हे सातपुडा पर्वतात, सिक्कीममध्ये व दक्षिण भारतात लावण्यात येते.

भारतात लावण्यात येणाऱ्या सिंकोनाच्या जातींचे मोठे किंवा मध्यम आकाराचे वृक्ष आहेत पण *सिंकोना लेड्जेरियाना* हा वेडावाकडा वेलासमान वाढणारा वृक्ष आहे.

## औषधी गुणधर्म

*सिंकोनाच्या* वरील जातींची वाळवलेली साल म्हणजे *सिंकोना* औषध आहे.

*सिंकोनाच्या* सालीत अनेक परिणामकारी तत्त्वे आहेत त्यापैकी 'क्विनाइन' हे मलेरियाच्या तापावरील उपयोगामुळे सर्वज्ञात आहे. या औषधामुळे ताप जलद गतीने

उतरतो. प्रमाणबध्दपणे औषध वेळोवेळी दिल्यास मलेरियाचा ताप नाहीसा होतो.

क्विनाइन काही जीवाणूमुळे होणारे संसर्गजन्य रोग थांबवण्यासही मदत करते. ते न्यूमोनिया, आमांश यावर काही औषधात वापरतात. डोळ्यात वापरायच्या मलमात ते वापरतात.

क्विनाइनपासून तयार केलेली औषधी संधिवाताच्या जागी लावण्यासाठी आणि चूळ भरण्यासाठी उपयोगी आहेत. क्विनाइन फार जास्त प्रमाणात घेतल्यास तात्पुरता किंवा कायमचा आंधळेपणा व बहिरेपणा येतो, चक्कर येणे व मळमळ होणे शक्य आहे. गर्भ राहिलेल्या बायकांना व हृदयाचा त्रास असणाऱ्यांना क्विनाइनयुक्त औषधी देण्यात येत नाहीत.

## इतर उपयोग

सिंकोनाच्या सालीतील इतर औषधी तत्त्वे व क्विनाईनवरून औषधे तयार करण्यात येतात. ती कीटकनाशक व कीटकांना दूर ठेवणारी म्हणून वापरण्यात येतात. पंख, केसाची कातडी, कपडे आदी टिकवण्यासाठी तसेच केस लेपनासाठीही वापरण्यात येतात.

सिंकोनाच्या सालीपासून क्विनाइन काढल्यावर तीच परत टनिन मिळवण्यासाठी वापरण्यात येते.

# २३. दालचिनी

*(सिनॅमॉन)*

**सिनॅमोमम व्हेरम** Presl. syn **सिनॅमोमम झिलॅनिकम** Blum. **आकृती ८**

*कुल :* लॉरेसीई

*भारतीय नावे :*
मराठी - *दालचिनी*
हिंदी - *दालचिनी*
बंगाली - *दालचिनी*
गुजराती - *दालचिनी*
कानडी - *लवंगपत्ती*
उडिया - *दालचिनी*
पंजाबी - *दालचिनी*
संस्कृत - *दारूशिला*
तामिळ - *कन्नालवंगपत्ती*




रेखाचित्र क्र. ८ दालचिनी (सिनॅमोमम व्हेरम)

*झिलॅनिकम* हे शास्त्रीय नाव सिलोनशी संबंधित आहे. या ठिकाणी हे झाड नैसर्गिक अवस्थेत वाढते.

## वर्णन

हे सदाहरित झाड आहे. वर्षभरात कधीही याची पाने गळून पडत नाहीत व ६ ते ८ मीटर उंच वाढते. पाने अंडाकृती, जाड, कातड्यासारखी, अग्रास टोकदार, चकाकी असणारी, खालच्या भागात फिकट हिरवी; पानांच्या मुख्य शिरा पानाच्या पायापासून ते मध्यापर्यंत येणाऱ्या; फुले लहान, मोठ्या केसाळ गुच्छात; फळ लांबट किंवा अंडाकृती, सुमारे १.५ ते २ से. मी. लांब, गर्द जांभळे, एक बीजी.

## वितरण

हे झाड दक्षिण भारतात समुद्रसपाटीपासून १५०० मीटर उंचीवर उगवते, तसेच २००० मीटरपेक्षा कमी उंचीवरसुध्दा थोड्या भागात नियमित आढळते. भारताच्या काही भागात त्याची लागवडही केली जाते.

## औषधी गुणधर्म

झाडाच्या फांद्या तोडून त्यांची साल काढण्यात येते, आतली कोरडी साल म्हणजे दालचिनी आहे.

हे अतिसार, मळमळ आणि वांत्यावर वापरले जाते.

सर्वसाधारणपणे ते मसाला म्हणून वापरले जाते. सालीपासून सिनॅमॉन नावाचे तेल काढण्यात येते. या तेलाचे गुणधर्म सालीच्या गुणधर्माप्रमाणेच आहेत पण काही बाबतीत ते सालीपेक्षा सरस आहे. पोट दुखणे, पोटात वायू होणे यावर वापरले जाते, तसेच काही प्रकारचे जंतू व बुरशीनाशक गुणधर्मसुध्दा आहेत.

पानातून काढलेले तेल रुचिवर्धक आणि संरक्षणशील म्हणून मिठाई, साबणे वगैरेत वापरतात. काही प्रकारच्या संधिवातात दुखत असलेल्या जागेवर लावण्यासाठीही उपयोग करतात.

भारताची सिनॅमॉन सालीची वार्षिक गरज ४०,००० क्विंटल्स आहे. दक्षिण भारत, बंगाल, आसाम आणि आंध्र प्रदेश हे सिनॅमॉनच्या लागवडीकरिता योग्य समजण्यात येतात.

## इतर जाती

*सिनॅमॉमम* प्रजातीमध्ये इतर अनेक उपयोगी जाती आहेत.

*सिनॅमॉमम* कॅम्फोरा (L.) Presl (कॅम्फोर ट्री, कापूर) ची लागवड भारतात निलगिरी पर्वतात व उत्तर भारतातील वानस्पत्त्योद्यानात होते. पाने व लाकडाच्या उर्ध्वपतनाने या झाडापासून कापूर मिळतो. मुख्यतः मुडपणे, सूचणे आणि

संधिवातामुळे होणारे दुःख यावर वरून लावण्यासाठी कापूर वापरतात. यास काही प्रकारच्या अतिसारात पोटातूनही देण्यात येते किंवा हृदयाचे उत्तेजक म्हणूनही वापरतात.

कापूर आणखी अनेक प्रकारे वापरतात आणि दरवर्षी ५००० क्विंटल्सपेक्षा जास्त कापूर भारतात आयात होतो. (आता विशेष प्रकारच्या ऑसिममच्या जातीपासूनसुध्दा कापूर काढण्यात येतो. त्या प्रजातीत तुळशीचा समावेश होतो.)

*सिनॅमॉमम टॅनेला* Nees & Eberm. (हिंदी - *तेजफ्ता,* संस्कृत - **तमालपत्र,** तामिळ - *तलिशपत्री)* किंवा 'इंडियन कॅसिया' मध्य हिमालयात, आसाम व बंगालच्या भागात सापडते. पाने मुख्यतः मसाला म्हणून वापरतात, परंतु पोटातील वायूवर, अतिसारातसुध्दा वापरतात.

सुमारे १.३ लाख रुपयांचे सिनॅमॉन तेल १९७६-७७ साली आयात करण्यात आले.

## २४. कोल्चिकम

**कोल्चिकम ल्यूटेअम** Baker

*कुल :* लिलिअेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *हिरणतुतिया*
काश्मिरी - *इरकिम मूंद*
पंजाबी - *सूरनजाम करवि*
संस्कृत - *हिरण्यअतुथ*

कोल्चिकम हे व्यावहारिक नाव या झाडाच्या शास्त्रीय नावावरून देण्यात आले आहे. बिया आणि धनकंद या दोन वस्तू कोल्चिकम सिडस आणि कोल्चिकम कॉर्म या नावाने ओळखल्या जातात व व्यापारिक दृष्ट्या महत्त्वाच्या आहेत.

### वर्णन

तपकिरी रंगाचा, शंक्वाकृती धनकंद असलेली वार्षिक औषधी; धनकंदाचा एक भाग सपाट व दुसरा गोलाकार; पाने फारच अरुंद परंतु अग्राकडे रुंद, फळधारणेबरोबर आकाराने वाढणारी, १५-३० से. मी. लांब, .८ ते १.५ से. मी. रुंद; फुले मोठी. २.५-४ से. मी. परिघ असलेली, ७-१० से. मी. लांब, पिवळी; फळे २.५-४ से. मी. लांब, वरचा चोंचीसारखा बाकदार भाग मागे वळलेला.

## वितरण

हे झाड वायव्य हिमालयात ७०० ते २८०० मीटर उंचीवर जंगलाच्या कडेकडेने किंवा उघड्या कुरणावर सापडते.

## औषधी गुणधर्म

फुले येण्याच्या आधी या झाडाचे जमा केलेले घनकंद कॉल्चिकम कॉर्म व वाळवलेल्या (पूर्ण वाढलेल्या) बिया म्हणजेच कॉल्चिकम औषध होय.

घनकंदात 'कॉल्चिकम्' नावाचे क्रियाशील तत्त्व असते. ते संधिरोगाच्या सुजण्यावर आणि दुखण्यावर उपयोगी आहे. *कॉल्चिकम्वर* केलेल्या वैद्यकीय प्रयोगांवरून त्याच्या कमी प्रमाणाने व दीर्घ औषधोपचाराने सुमारे ६० टक्के रुग्णांवर यशस्वी वापर दिसून आला आहे. या औषधाच्या वापराने अन्ननलिकेत अतिपोटशूळ व आग होते. हे थांबवण्यासाठी बेलाडोना व हायोसायामस् ही औषधे वापरण्याची शिफारस करण्यात येते.

मुख्यतः बियात व बियाच्या आवरणात *कॉल्चिसिन्* असते. घनकंदाच्या औषधासारखा याचा उपयोग होतो.

कर्करोगातील कर्कजन्य ऊतींवर कॉल्चिसिनच्या उपयोगाची चाचणी घेण्यात आलेली आहे. या औषधाने पेशी विभाजनाची प्रक्रिया थांबते व ऊती क्ष किरणांच्या उपचारास जास्त ग्रहणक्षम बनतात. या बाबतीत बऱ्याच संबंधित संस्थांमधून अजून संशोधन प्रगतीपथावर आहे, परंतु आजपावेतो याचा सर्वसामान्य वापर झालेला नाही.

भारताची *कॉल्चिसिनची* मागणी वार्षिक २५ क्विंटल्स आहे. हिमालयात उंच ठिकाणी (१५०० ते ३००० मीटर) ही झाडे लावली जाऊ शकतात.

## इतर उपयोग

वनस्पतीशास्त्रांत प्रजनन प्रयोगासाठी कोल्चिसिनचा वापर मोठ्या प्रमाणावर केला जातो. याने मूळ गुणसूत्रांच्या संख्येत वाढ होते.

## २५. कॉप्टिस

**कॉप्टिस तीता Wall**

*कुल :* रॅननूक्युलेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *ममिरा, मिश्मि तीता*

आसामी - *तीता*

बंगाली - *तीता*

मिश्मी - *अरोंग, पावा*

शास्त्रीय नावातील जातीचे नाव स्थानिक नावावरून घेण्यात आलेले आहे.

### वर्णन

लहान खोडरहित औषधी; मूलस्तंभ काष्ठमय, सोनेरी पिवळा, दाट धाग्यांनी व्यापलेला, फार कडू; पाने संयुक्त, गुळगुळीत; पर्णिका ५.०-७.५ से. मी. लांब, अंडाकृती - भालाकृती; फुले लहान, सममित, पांढरे; फळ पुष्कळ बिया असलेले, पुटक प्रकारचे; बिया काळ्या.

### वितरण

भारतामध्ये समशीतोष्ण मिश्मी टेकड्यात व अरुणाचल प्रदेशात सापडते.

### औषधी गुणधर्म

वाळवलेले मूलस्तंभ तीतामुळे म्हणून ओळखले जाते. त्यातील औषध शक्तिवर्धक, पोटदुखीवर आणि अशक्तपणावर गुणकारी आहे. तसेच मधून मधून येणाऱ्या तापावरही वापरण्यात येते.

त्यातील क्रियाशील तत्त्वे म्हणजे 'बरबेरिन समूहाचे' ॲल्कलाईड्स होत. या झाडाच्या औषधास निर्यातीने चांगली किंमत मिळते. यामुळे झाडांची मोठ्या प्रमाणावर तोड होते व सध्या हे झाड नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. या झाडास संरक्षण मिळावे या दृष्टीने निर्यातीवर मर्यादा घालण्यात आली आहे. मर्यादा अस्तित्वात येण्याआधी या औषधाचे वार्षिक उत्पन्न ४० क्विंटल्स होते. या औषधात 'थॅलिक्ट्रम व पिक्रोऱ्हायझाची' भेसळ करण्यात येते.

# २६. वेणी वेल

**कॉसिनियम फेनेस्ट्रॅट्म** (Gaertn.) Colebr.

*कुल :* मेनिस्पर्मेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *वेणीवेल*
हिंदी - *झाडी हलदी*
बंगाली - *हालदिगच*
कानडी - *मरमंजलि*
संस्कृत - *दारूहरिद्र*
तामिळ - *मरामंजलि*
तेलुगू - *मनुपसुपू*

## वर्णन

मजबूत, काष्ठमय वल्ली क्षुप; साल पिवळसर, कोवळी असतांना दाट केसयुक्त; पाने कातडी पोताची, चकाकणारी, वरचा पृष्ठभाग गुळगुळीत, खालच्या पृष्ठभागावर किंचित केस, गोलाकार, निमुळत्या अग्राचे; मुख्य शिरा ५-७; फुले लहान लहान गुच्छांमध्ये.

## वितरण

हे झाड मुख्यतः दक्षिण भारतातील पश्चिम घाटात मिळते.

## औषधी गुणधर्म

झाडाची वाळवलेली खोडे म्हणजेच वेणीवेल औषध होय. या खोडात 'बरबेरिन' असते. हे औषध तापात, अशक्तपणात किंवा आजारीपणामुळे आलेला अशक्तपणा आणि काही प्रकारच्या आग्निमांद्यात उपयोगी आहे. हे पूतिनाशक म्हणूनही समजण्यात येते आणि जखमांवर लावण्यासाठी वापरण्यात येते.

झाडांची मुळे प्रतिजैविक असल्याचे सांगण्यात येते.

## इतर उपयोग

खोडापासून पिवळा रंग निघतो ज्यास नुसते किंवा हळदीबरोबर मिसळून वापरण्यात येते.

# २७. पेंवा

*(कॉस्ट्स)*

**कॉस्ट्स स्पेसिओसम** (Koen ex Retz) Sm.

*कुल :* झिंजिबरेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *पेंवा*
हिंदी - *केउ*
बंगाली - *कुस्थ*
गुजराती - *पोकरमूल*
कानडी - *चेंगलवकोष्टू*
मल्याळी - *कोएट्टम*
पंजाबी - *केवली*
संस्कृत - *कुस्थ*
तामिक - *कुरारम*
तेलुगू - *किमुक*

## वर्णन

सरळ, ताठ वाढणारी औषधी; मूलकाष्ठ जमिनीच्या समांतर; पाने १५-३० से. मी. लांब, जवळपास देठविरहित, खालच्या पृष्ठभागावर रेशमी केसांसह; फुले पांढरी, लाल सहपत्र असलेली, नळीसारखे, ५-१३ से. मी. लांब; दाट कणिसामध्ये; फळ लाल, बोंड प्रकारचे, त्रिकोणी, (दोन से. मी. परिघाचे); बिया काळ्या.

## वितरण

हे झाड भारतात सर्वत्र मिळते, विशेषतः सपाट व १२०० मीटर उंचीच्या प्रदेशात प्रकर्षाने दिसते. टाकावू आणि उजाड जमिनींवर विपुल प्रमाणात व सर्वसाधारणपणे सापडते. हे याच्या मूलकाष्ठासाठी व शोभेचे झाड म्हणून लावले जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या ताज्या व वाळवलेल्या मूलकाष्ठांचा समावेश औषधात होतो. मूलकाष्ठ श्लेष्मल व तुरट असतो. त्यात शक्तिवर्धक व रेचक गुणधर्म असतात. मुळ्या हगवण थांबवणारी असल्याचे सांगतात. उत्तर प्रदेशात त्यास शक्तिवर्धक, कृमीविरोधी व कामोत्तेजक औषध म्हणून वापरतात. पडशामुळे येणारा ताप, कफ, आग्निमांद्य,

कृमिवर, चर्मरोगावर आणि सर्पदंश आदीवर या झाडाची मुळे वापरतात. स्टेरॅइड काढण्यासाठी ही जाती कच्च्या देशी पदार्थापैकी एक आहे. तथापि डायोसनिनची टक्केवारी डायोस्कोरिया या प्रजातीच्या जातीपेक्षा कमी आहे. या झाडापासून काढलेल्या स्टेरॉइडल संयुगांमध्ये गर्भधारणाविरोधी गुण आहे. तसेच सूज न येण्यासाठी आणि संधिवातात येणारी सूज उतरवणारी तत्त्वे असल्याचे प्रयोगांनी दाखवून दिले आहे. काही स्टेरॉइडल संयुगे, ही लावलेल्या जागी बधिरता आणण्याची क्रिया करतात.

### इतर उपयोग

मूलकाष्ठ शिजवल्यावर खाण्यास योग्य होतो. त्यात पिष्ठमय पदार्थ भरपूर प्रमाणात असतात परंतु इतर कंदाच्या तुलनेत तंतुमयपणा जास्त असतो.

## २८. सिंबोपोगॉन

**सिंबोपोगॉन जाती**

*कुल* : ग्रॅमिनी

सिंबोपोगान्च्या अनेक जाती भारतात उगवतात. यातील काहीची लागवड करण्यात येते, काही जाती औषधी असल्याचे सांगण्यात येते परंतु यापैकी कुठलीही जाती फारशी महत्त्वाची नाही.

सिंबोपोगॉन या प्रजातीचे गवत उंच आणि सुगंधी औषधी आहे. यापासून तेल काढण्यात येते. सुगंध वाढवण्यासाठी त्याचा मोठ्या प्रमाणावर वापर करण्यात येतो. सुगंधी व औषधी दृष्ट्या महत्त्वाच्या जाती खालीलप्रमाणे आहेत. *सिंबोपोगॉन सिट्रॅटस्* (DC.) Stapf. ही भारताच्या विविध भागात उगवण्यात येते. त्यापासून काढलेल्या तेलास 'वेस्ट इंडियन लेमन ग्रास ऑइल' म्हणतात. याच्या पानांचा काढा काहीवेळा चहाऐवजी उत्साहवर्धक पेय म्हणून घेण्यात येतो.

*सिंबोपोगॉन फ्लेक्स्युओसस* (Nees ex steud) Watson *ही जाती दक्षिण भारत, उत्तर प्रदेश व सिक्कीममध्ये सापडते. त्यापासून 'लेमनग्रास ऑइल' निघते. हे तेल अ जीवनसत्त्वयुक्त असते. हे गवत केरळमध्ये लागवडीखाली आणण्यात आले आहे. त्याचा वापर अत्तरे व सुगंधी सामानात केला जातो.*

*सिंबोपोगॉन मार्टिनीई* (Roxb.) Watson (हिंदी - *रोशा, रोहिशा, मिरसियागंध, गंधवेल*) हे गवत भारतातील कमी पावसाच्या प्रदेशात उगवते. यापासून रोशा तेल निपजते. ते कमरेतील उसण, टक्कल पडणे आणि त्वचारोगावर उपयोगी आहे; पित्ताच्या त्रासामध्ये ते सेवन केले जाते. हे तेल डास हाकलण्यासाठी मलमातही वापरतात. *सिंबोपोगॉन नारड्स* (L.) Rendle हे भारताच्या विविध भागात उगवते.

मुख्यतः दक्षिण भारतात ते जास्त सापडते. या जातीपासून सुप्रसिध्द 'सिट्रोनेला ऑईलचे' उत्पादन होते. ते कीटक पळवणाऱ्या मलमामध्ये वापरले जाते. सिट्रोनेला ऑइलची भारताची वार्षिक गरज २०० क्विंटल्सची आहे. ११ लाख रुपयाचे 'लेमन ग्रास आईल' १९७६-७७ साली निर्यात करण्यात आले.

## २९. धोतरा

**डटुरा स्ट्रामोनियम्** (L.)

*कुल :* सोलॅनेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *धोतरा*
हिंदी - *धतुरा*
बंगाली - *शेटधतुरो*
गुजराती - *धोलो धतुरो*
मल्याळी - *उमात्तई*
संस्कृत, पंजाबी - *धतुरा*
तामिळ - *उमात्तई*
तेलुगू - *दत्तुरामु*

जुन्या भारतीय लिखाणात याचा 'शिवशेखर' या नावाने संदर्भ आलेला आहे. धोतऱ्याच्या फुलाचे भगवान शंकराशी नाते असल्याचे गृहीत धरण्यात आलेले आहे.

### वर्णन

१ मीटर उंचीपर्यंत वाढणारे झुडुप; पाने मोठी अंडाकृती, दातेरी; फुले फार मोठी पांढरी; फळ अंड्याच्या आकाराचे, चार भागांत विभागलेले, लांब किंवा आखूड काट्यानी व्यापलेले.

### वितरण

हे झाड समशीतोष्ण हिमालयात, २५०० मीटर उंचीवर आणि मध्य व दक्षिण भारताच्या डोंगराळ भागात सापडते.

### औषधी गुणधर्म

वाळलेली पाने, फुले असलेल्या फाद्यांचे शेंडे आणि बिया म्हणजेच धोतरा औषध आहे.

'हायोसायामिन' हे पानातील मुख्य आणि महत्त्वाचे क्रियाशील तत्त्व आहे. म्हणून हे औषध बेलाडोना किंवा हायोसायामससारखे उपयोगी आहे. हे औषध

फुप्फुसाच्या नळ्या सुजण्यावर, दम्यावर आणि तोंडातील लाळेवर नियंत्रण ठेवण्यासाठी उपयोगी आहे. तसेच स्नायूंच्या झटक्यांवर नियंत्रण ठेवण्यासही या झाडाची पाने जाळून धूर नाकाने आत घेतल्यास दम्यावर आराम पडतो. बियांमध्येसुध्दा हायोसायामिन् असल्याने पानासारखेच औषधी गुणधर्म आहेत.

## इतर जाती

**डटुरा** या प्रजातीच्या इतर दोन जाती औषधी आहेत. त्या अशा.

*डटुरा मेटल L.* ही ओसाड जागेवर भारतात सगळीकडे सापडते. तिची फुले पांढरी किंवा पिवळसर आणि बऱ्याचवेळा बाहेरील बाजूस जांभळी असतात. फळावर आखूड काटे असतात. बागेत लावलेल्या झाडांच्या फुलांना दलपुंज्याची दोन मंडले असतात. जास्त दूध सुटल्याने सुजलेल्या स्तनांना याच्या पानांचे पोटिस बांधल्यास सूज उतरते. या झाडाची पाने आणि बियांचे औषधी गुणधर्म *डटुरा स्ट्रामोनियम* या जातीसारखेच आहेत. *डटुरा इनोक्सिया* Mill *हे विदेशी झाड आहे, परंतु भारताच्या विविध भागात नैसर्गिक अवस्थेत उगवते. याच्या फुलांच्या दलपुंजास १० कोपरे असतात (डटुरा मेटलमध्ये* फुलास पाचच कोपरे असतात.). या झाडाची फळे लांबट असतात आणि त्यावर बारीक काटे व आत तपकिरी बिया असतात. याच्या पानांचे औषधी गुणधर्म *ड. स्ट्रामोनियम* या जातीच्या पानासारखेच असतात. या झाडांची मुद्दाम लावून व्याप्ती वाढवण्याची शिफारस करण्यात आलेली आहे. ह्याची भारतातील वार्षिक मागणी ४० क्विंटल्स ठरवण्यात आली आहे.

# ३०. तिळपुष्पी

### *(डिजिटॅलिस, फॉक्सग्लोव्ह)*

**डिजिटॅलिस परप्युरीया** L.

*कुल :* स्क्रॉफ्युलारियेसीई

*भारतीय नावे* : हिंदी - *तिलपुष्पी*

या झाडाचे व्यावहारिक नाव 'तिळपुष्पी' हे त्याच्या तिळाच्या (सिसॅमम इंडिकम L) फुलासारख्या दिसणाऱ्या फुलांशी संबंधित आहे.

## वर्णन

१.२ मीटर उंच वार्षिक किंवा द्वैवार्षिक औषधी; तळाची पाने लांब देठांनीयुक्त केसाळ, अंडाकृती, १५-३० से. मी. लांब, वरची पाने जवळपास देठविरहित व वर

लहान लहान होत जाणारी; फुले ५-८ से. मी. लांब, पांढरी किंवा जांभळी, दले केसासह, ३०-६० से. मी. लांब, एका बाजूस वाढणाऱ्या पुंजक्यात; फळ अंडाकृती.

## वितरण

मूलतः हे झाड भारतीय नाही. ते मुख्यतः उत्तर भारतातील काश्मिरच्या डोंगराळ भागात लावले जाते. पूर्वी ते दार्जिलिंग व निलगिरीच्या डोंगरातही उगवण्यात येत असे पण आता ही लागवड बंद झाली आहे. काही ठिकाणी मात्र हे झाड लागवडीतून निघून नैसर्गिकरित्या वाढू लागले आहे.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली पाने म्हणजे औषध आहे. पाने जमा केल्यानंतर लवकरात लवकर ६०° C° तपमानात वाळवण्यात यावीत.

या औषधाचा मुख्य उपयोग हृदयाच्या रोगांवर आहे. या औषधामुळे सर्व स्नायूंच्या उती हालचालींना उत्तेजन मिळते. हृदय चोंदून पडण्यावर ते वापरण्यात येते. डिजिटालिसमुळे हृदय रोहिण्यांमध्ये रक्त वेगाने वाहते; यामुळे हृदयाची पोषणस्थिती चांगली होते. जेव्हा रक्ताभिसरण बिघडून जलोदर होतो तेव्हा डिजिटालिस हृदयाचे कार्य पूर्ववत व नियमित करण्यासाठी मदत करते.

मूत्राशयाच्या रक्तपुरवठ्यात सुधारणा करते व लघवी होण्यास मदत करते, तसेच मूत्राशयातील अडथळे दूर करते.

जळालेल्या जखमा व साध्या जखमांवर लावण्यासाठी जी मलमे असतात त्यात डिजिटालिस वापरतात. तथापि या औषधाचा एकूण विषारी परिणाम होऊन डोके दुखणे, चक्कर येणे जाणवते. या दुष्परिणामांवर लक्ष ठेवले गेले पाहिजे.

## इतर जाती

डिजिटालिस्ची दुसरी जाती, *डिजिटालिस लॅनटा* Ehrh. (Wodly Foxglove) *काश्मिरमध्ये लावली जाते व लागवडीच्या जागेपासून फैलावून इतस्ततः उगवते. हिची फुले लहान, केसाळ, बदामी पिवळ्या रंगाची किंवा जांभळ्या रंगाची असतात. या झाडात मोठे औषधी गुण आहेत व डिजिटालिस परप्यूरिया* इतके दुष्परिणाम पण होत नाहीत. तिळपुष्पी या औषधाची भारताची एकूण वार्षिक मागणी ३० क्विंटलस् आहे.

# ३१. डायोस्कोरिया

**डायोस्कोरिया जाती**

*कुल* : डायोस्कोरिअेसीई

ही वल्लीर वनस्पतींची एक मोठी प्रजाती आहे. काही जातींची खोडे आरोही आधाराभोवती उजवीकडे वेटोळे करून चढतात तर काहींची डावीकडून वेटोळे करतात; पाने साधी किंवा संयुक्त असतात; शिरा बहुतेक ठळक असतात; बहुतेक जातींमध्ये आकंद मुळे असतात, आणि आकंदासारख्या गोलाकार किंवा वेगवेगळ्या प्रकलिका पानांच्या अक्षकोनातून निघतात.

*डायोस्कोरियाच्या* सुमारे ५० जाती भारतात सापडतात. अनेक जाती त्यांच्या खाण्यास योग्य असलेल्या कंदासाठी(यामस) लावल्या जातात. ही प्रजाती त्यातून निघणाऱ्या 'डायोस्‌जिनिन्'सारख्या स्टीरिऑइड 'सॅपोजिनिनमुळे' अलीकडे महत्त्वाची मानली जाऊ लागली आहे. ही भविष्यात 'कॉर्टिझोन्' तयार करण्यासाठी, संधिवातात सांधे सुजण्याच्या उपचारात आणि लिंगसंप्रेरके (सेक्स हार्मोन्स) तयार करण्यासाठी उपयोगी ठरेल.

*डायोस्कोरिया डेल्डॉयडिया Wall (पंजाबी - क्रिस, कित्र;* काश्मिरी - *किंस, किथि, किल्डी)* ही वायव्य हिमालयापासून ते मध्य हिमालयापर्यंत सापडणारी विशाल वल्लरी आहे. हिच्या आकंदात भरपूर डायोसजेनिन आहे.

*डायोस्कोरिया प्राझेरि Prain & Burkill (syn. D. deltoidea Wall var. sikkimensis Prain, डायस्कोरिया सिक्किमेंसीस Prain & Burkill)* ही जाती पूर्व हिमालयात आणि बिहार, बंगाल, नेपाळ, सिक्किम, भूतान आणि उत्तर आसाममध्ये सापडते. हिस आता भारताच्या इतर भागातही यशस्वीरित्या वाढवण्यात आले आहे. हिच्या आकंदात डायोसजेनिनचे प्रमाण विपुल आहे.

## *इतर उपयोग*

डायोस्कोरियापासून मिळणारे याम्स सर्वसामान्य खाण्याची वस्तू आहे; विशेषत:डोंगरात राहणारे आदिवासी व गरीब लोक तिचा वापर करतात.

*डायोस्कोरिया ॲलाटा L. हिंदी आणि बंगाली - खमाल, चुपडी आलु;* कानडी - *ऑथालाइगास्, तंगजेनासू;* मल्याळी - *कावाथु;* तामिळ - *पेरूवल्लीकिझांग;* तेलुगू - *पेंडालामु)* ही वल्लरी मोठी आहे. तिच्या खाण्याच्या आकंदासाठी ती लावली जाते. *डायस्कोरिया बल्बिफेरा L., डायस्कोरिया हिसपिडा Dennst.* आणि डायोस्कोरिया

पेन्टाफायला L या जाती बहुतेक सर्व भारतात सापडतात. यांचेही आकंद खातात. ही आंकदे योग्य प्रक्रियेनंतरच खाण्यास योग्य होतात.

डायोस्कोरियाच्या काही जातीपासून इंडस्ट्रियल स्टार्च काढतात.

# ३२. वेलदोडे

*(इलायची)*

**इलेटारिया कॉरडॅमॉमम** (L.) Maton आकृती ९

*कुल :* झिंजिबरेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *वेलदोडे*
हिंदी - *छोटी इलायची*
बंगाली - *छोटो-एलाच*
मल्याळी - *एलम*
संस्कृत - *एला, उपकंचिका*
तामिळ - *एलम, येलक्कई*
तेलुगू - *एलाकी*

## वर्णन

जाड, रसाळ, बहुशाखीय मूलकाष्ठ आणि अनेक सरळ हवेत वाढणारी खोडे असणारी औषधी, काहीवेळा ३ मीटरपर्यंत उंच वाढणारी; पाने फार मोठी ३०-९० से. मी. लांब, अरुंद, एक ठळक मध्याशिरा व त्यापासून निघणाऱ्या अनेक लघुशिरा असलेली; पुष्पविन्यासाचा दांडा खोडांच्या खालच्या भागात जमिनीजवळ निघतो; फुले ४ से. मी. लांब, पांढरी किंवा फिकट हिरवी, ३०-९० से. मी. लांब गुच्छात. फळे सुमारे १.५ से. मी. लांब फिकट हिरवी, पिवळी, अंडाकृती, ३ कोष्ठकी, अनेक बिया असलेले; बिया त्रिकोणाकार, तपकिरी-काळ्या; झाडांचा आणि त्याच्या अवयवांचा आकार ठिकाणांवर आणि जातींवर अवलंबून असतो व बदलत असतो. तथापि फळे आणि बियांच्या आकारात फारसा फरक दिसत नाही. बाजारात येणाऱ्या बहुतेक फळांना गंधकाची धुनी देऊन रंगहीन पांढरे केले जाते.

## वितरण

दक्षिण भारतात ते विशेषतः म्हैसूर केरळच्या डोंगराळ भागातील ओल्या जंगलात नैसर्गिक अवस्थेत सापडते. ते भारतात इतस्ततः लावलेसुध्दा जाते.



रेखाचित्र क्र. ९ वेलदोडे (इलेटारिया कॉरडॅमॉमम)

## औषधी उपयोग

वाळलेल्या फळांचा औषधात समावेश होतो. आवश्यक तेव्हा फळे फोडून बिया काढतात व या बियाच वापरल्या जातात. पोटाच्या फुगाऱ्यावर आराम मिळवण्यासाठी मुख्यतः कॉरडॅमॉमचा उपयोग होतो. वस्तूतः ते पचनास मदत करते. ते रेचकाबरोबरपण वापरतात आणि सुगंधी पदार्थ म्हणून वापरतात. कॉरडॅमॉमची आले, जिरे, लवंगा या बरोबर भुकटी करण्यात येते व ती अपचन आदीवर उपयोगी असते.

## इतर उपयोग

स्वयंपाकात, वड्यांमध्ये व मिठायांमध्ये कॉरडॅमॉमम मोठ्या प्रमाणावर वापरले जाते. बियापासून काढलेल्या तेलास सुगंधी म्हणून पेयात वापरतात. १९७८-७९ मध्ये ५५० लक्ष रुपयाचे वेलदोडे निर्यात करण्यात आले.

# ३३. वावडिंग

*(एंबेलिया)*

**इंबेलिया त्स्जेरियम** A. DC.

*कुल* : मिर्सिनेसी

*भारतीय नावे* : मराठी - *वावडिंग, अंबाडी*
हिंदी - *बाईबिरंग, भुंगी, गाइया*
बंगाली - *धाडकि-झांटी*
उडिया - *नूनूनिया*
(संथाल - भाबरी)

यास शास्त्रीय नावावरून एंबोलियापण म्हणतात.

## वर्णन

क्षुप किंवा लहान वृक्ष याच्या कोवळ्या फांद्यांवर केस असतात, जुन्या फांद्या गुळगुळीत; फांद्या पांढऱ्या, ग्रंथीमुळे ठिपकेदार दिसतात; पाने १२ से. मी. लांब, दोन्ही टोकास निमुळती, ग्रंथीमुळे सगळीकडे ठिपकेदार, कडा साध्या किंवा दातेरी, खालच्या पृष्ठभागावर करड्या रंगाची, शिरांवर केसाळ; फुले लहान, फिकट हिरवी, अक्षकोनातून निघणाऱ्या आखूड दाट समूहात; फळ लहान, वर्तुळाकार, पक्व झाल्यावर टोकास लाल.

## वितरण

हे झाड मुख्यतः पूर्व भारतात व दक्षिणेच्या पठारावर सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली फळे म्हणजे औषध होय. पट्टकृमीवर या औषधाचा मुख्य उपयोग आहे. योग्य प्रमाणात घेतल्याने पट्ट कृमी मरतात; यानंतर रेचक घेऊन यांना बाहेर काढतात. वाइवडुंगमध्ये सौम्य रेचक गुणधर्म आहे. अलीकडच्या प्रयोगावरून असे दिसून आले आहे की हे औषध फक्त पट्टकृमीवरच परिणामकारक आहे, हुकवर्मस आणि गोलकृमीवर फारसे परिणामकारक नाही. ते गांडूळ नष्ट करते आणि ॲस्क्यारियासिसमध्ये उपयोगी असू शकते. या औषधात प्रतिजैविक व क्षयरोग नाशक गुणधर्म आहेत.

## इतर जाती

या जातीच्या जवळच्या इतर जाती *एंबेलिया राइबिस* Burm. f *भारतात सगळीकडे सापडते. एंबेलिया त्स्जेरियमकॉटमच्याच* स्थानिक नावाने या जातीस ओळखले जाते. दोन्हीच्या फळांमध्येसुध्दा सारखेच गुणधर्म आहेत आणि हे सुध्दा निश्चित झाले आहे की त्यातील अधिकृत औषधसुध्दा 'एंबेलिया' आहे.

# ३४. आवळा

(एम्ब्लिका मायरोबलान)

**एम्ब्लिका ऑफिसिनालिस** Gaertn. syn. **फायल्यान्थस एम्ब्लिका** L.

*कुल :* युफोर्बिसीई **आकृती १०.**

*भारतीय नावे :* मराठी - *आवळा*
हिंदी - *आंवला*
आसामी - *चुकना-आमलकी*
बंगाली - *आमलोकी*
गुजराती - *आमडां, राय आमला*
मल्याळी - *आमलकम, नेल्ली*
उडिया - *आवडा*
संस्कृत - *आम्लिका*
तामिळ - *नेल्लिक्कई*





रेखाचित्र क्र. १० आवळा (एमाब्लिका ऑफिसिनालिस)

आवळ्याचे फळ सर्वांना माहीत असलेल्या त्रिफळा चूर्णातील एक घटक आहे. याला इंबलिका मायरोबलान म्हणतात. त्रिफळा चूर्णातील इतर दोन घटक फळे म्हणजे हिरडा व बेहडा होय.

## वर्णन

लहान किंवा मध्यम आकाराचा पानझडी वृक्ष. पाने १०-१३ मि. मी. लांब, २-३ मि.मि. रुंद, अगदी जवळ जवळ लागलेली, पिच्छाकृतीसमान दिसणारी; फांद्या सर्वसाधारणपणे पिच्छाकृती दिसतात; पुं-पुष्प आणि स्त्री-पुष्प एकाच झाडावर येतात, पुष्पे फिकट हिरवी, पानाखालील लहान दाट समूहात; पु पुष्पे लहान, दांड्यावर अनेक; स्त्री पुष्पेसुध्दा लहान पण कमी; फळ १.५ – २.५ से. मी. परिघ असलेले, रसाळ गोलाकार, काहींसे अस्पष्ट ६ भागात विभागलेले व रेषा असलेले, फिकट हिरवे किंवा पिवळसर; बिया ६; लावलेल्या आवळ्याच्या झाडाची फळे मोठी असतात.

## वितरण

भारतातील उष्ण व त्या लगतच्या प्रदेशात सगळीकडे पूर्वी हे झाड मध्य प्रदेशच्या पानझडी जंगलात भरपूर प्रमाणात सापडत होते. यातल्या पुष्कळ झाडांची फळे वायाच जातात.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली किंवा ताजी फळे औषधी आहेत.

यापासून व वर निर्देशित तीन फळांपासून त्रिफळा चूर्ण तयार होते. ते रेचक म्हणून वापरले जाते तसेच लिव्हर वाढणे, मुळव्याध, पोटाचा त्रास आणि डोळ्यांच्या उपचारात वापरले जाते. यकृतासाठी आवळ्याची फळे चांगली शक्तिवर्धक असतात. कच्ची फळे थंड व रेचक आहेत. फळे आंबवून काढलेल्या पाण्याचा उपयोग अपचन, अशक्तपणा, कावीळ, हृदयाच्या ठराविक आजारात आणि लघवी होण्यासाठी करण्यात येतो. यात 'क' जीवनसत्त्व भरपूर प्रमाणात असते, आणि स्करव्हीसारख्या क जीवनसत्त्वाअभावी होणाऱ्या रोगात उपयोगी आहे, असे दिसून आले आहे. आवळ्यातील क जीवनसत्त्व माणसाच्या शरीरात कृत्रिम क जीवनसत्त्वापेक्षा त्वरित शोषून घेतले जाते. या गुणधर्मासाठी या फळातील काही अनोळखी घटक जबाबदार असावेत. वाळवलेली फळे हगवणीत आणि अतिसारात उपयोगी आहेत. भारतीय आयुर्वेद औषध पध्दतीत तर उपचारासाठी लोणच्यातील फळेसुध्दा वापरण्यात येतात.

या झाडाची फुले, मुळे, सालसुध्दा औषधी आहेत. असे सांगण्यात येते की बिया दमा व पोटाच्या विकारावर गुणकारी आहेत.

## इतर उपयोग

शाई, रंग आणि केसांच्या शांपूमध्ये आवळ्याची फळे मोठ्या प्रमाणावर वापरली

जातात; फांदी व फळे रंगासाठी आणि रंगवण्यासाठी वापरली जातात. किरकोळ घरगुती कामांसाठी लाकूड उपयोगी आहे; हे पाण्यात टिकते म्हणून विहिरीच्या वगैरे कामासाठी वापरण्यात येते.

पाने वेलदोड्याच्या झाडासाठी खते म्हणून वापरली जातात.

१.७ लाख रुपयाचे आवळे १९७७-७८ साली निर्यात करण्यात आले.

# ३५. एफेड्रा

**एफेड्रा जिरार्डीयाना** Wallich

*कुल* : निटेसीई

*भारतीय नावे* : हिंदी - *आसमानिया, फोक, खांदा;*
पंजाबी - *बुडशुर*
(जौसर - टुटगंधा)

एफेड्रा हे व्यावहारिक नाव शास्त्रीय नावावरून घेण्यात आलेले आहे.

## वर्णन

एक मीटर उंचीपर्यंत वाढणारे लहान क्षुप; खालच्या भागात खोड टणक व बहुशाखीय; शाखा मंडलात वर वाढण्यापेक्षा सुरुवातीला थोड्या पसरणाऱ्या किंवा सरळ वाढणाऱ्या. पाने दोन दातेरी छदांमध्ये बदलेली; पु-पुष्पे थोडी, अंडाकृती कणिसात, स्त्री-पुष्पे १-२, आखूड कणिसात; फळ ७-१० मि. मी. लांब, अंडाकृती, लाल, जाड, सहपत्रांनी वेढलेले.

## वितरण

उंच, कोरड्या हिमालयाच्या रांगामध्ये २००० ते ४००० मीटर उंचीवर हे झाड सापडते. हे मुद्दाम लावलेही जाते.

## औषधी गुणधर्म

*एफेड्रा जिरार्डीयानाची* शरद ऋतूत जमा केलेली कोरडी खोडे म्हणजे एफेड्रा औषध आहे.

या औषधात 'एफेड्रिन' असते ते दम्याच्या औषधोपचारात, विशेषतः ब्रांकियल अस्थम्यात वापरतात. श्वासनलिकेतील बेडका काढण्यासाठी हे औषध मुखाद्वारे किंवा इंजेक्शनद्वारे देण्यात येते. हे हृदयासाठी उत्तेजक म्हणूनही वापरले जाते. ज्या रुग्णाच्या हृदयावर न्यूमोनिया, घटसर्प आदींच्या संसर्गामुळे परिणाम झालेला आहे तिथे एफेड्रा फार परिणामकारक हृदय-उत्तेजक म्हणून सिध्द झालेले आहे.

ॲलर्जीमुळे होणारे पुरळ व तापातही याचा वापर करण्यात येतो. एफेड्रिनचा समावेश असलेली अनेक प्रकारची औषधे आज प्रचलित आहेत. ती सायनोसायटिसमध्ये नाकात घालायच्या औषधात, दम्याच्या झटक्यात, भऊ नाजूक कातडीच्या सूजेत वगैरेत उपयोगी आहेत. या औषधाचा मूत्राशयावरपण गुणकारी परिणाम होतो, झोपेत रात्री लहान मुलांना होणारी लघवी थांबवण्यासाठी याचा वापर होतो.

एफेड्रिन जास्त प्रमाणात घेतल्यास मळमळ वाटणे, घाम येणे, आणि चर्मरोग वगैरे सारखे रोग होतात.

## इतर जाती

एफेड्रा या प्रजातीची *एफेड्रा मेजर* ही जाती लाहुलमध्ये सांपडते; तीत *एफेड्रा जिरार्डियानापेक्षा* जास्त ॲल्कलॉईडस् असतात. म्हणून दोन्ही जातीच्या फांद्या एफेड्रा औषध म्हणून वापरल्या जातात.

एफेड्रिनचा नियमित पुरवठा होण्यासाठी वरील दोन झाडे किंवा *एफेड्रा ईक्विसेटिना* आणि *एफेड्रा सायनिका* या चिनी जातींची लागवड आवश्यक आहे कारण त्यात एफेड्रिन आहे.

उत्तर भारतातील काश्मिर, पंजाब, हिमाचल प्रदेश इत्यादी अनेक भाग आणि उत्तर प्रदेशातील उंचीवरचे भाग एफेड्राच्या जातीच्या लागवडीकरिता योग्य आहेत.

सुमारे ३ लाख रुपयांची एफेड्राची उत्पादने १९७७-७८ साली आयात करण्यात आली.

# ३६. मोठी दुधी

**यूफोर्बिया हिरटा L. युफोर्बिया पिल्युलिफेरा (भारतीय फ्लोरामधील जे लिनायस्चे नाही)**

*कुल* : यूफोर्बिआसीई **आकृती ११**

*भारतीय नावे* : मराठी - *मोठी दुधी*
हिंदी - *लाल दुधी*
बंगाली - *बरकेरू*
गुजराती - *दुधेली*
मल्याळी - *नीलापाले*
संस्कृत - *नागार्जुनी पूसितोआ*
तामिळ - *अममपच्चे अरिस्सी*
तेलुगू - *नानाबला*




रेखाचित्र क्र. ११ मोठी दुधी (यूफोर्बिया हिरटा)

या झाडाचे दुधी हे नाव त्यातून निघणाऱ्या दूध सदृश्य पदार्थामुळे देण्यात आलेले आहे.

## वर्णन

रांगत रांगत वर येणारी किंवा ९० से. मी. पर्यंत सरळ, उंच वाढणारी, वार्षिक औषधी; खोड गोल पिवळसर केसांनी आच्छादलेले; पाने संमुख जोडीत, लहान ४ से. मी. पर्यंत लांब, वरचा पृष्ठभाग गर्द हिरवा, खालच्या पृष्ठभागावर फिकट, काठ पुसटसे दातेरी; फुले पांढुरकी, लहान, अक्षकोनातून निघणाऱ्या आखूड पुष्पबंधाक्षांवर; फळ लहान १-२ मि. मी. परिघ असलेला, केसाळ; बिया त्रिकोणी, सुरकुत्या पडलेल्या, फिकट तांबूस आरक्त-तपकिरी

## वितरण

हे झाड विविध प्रकारच्या जमिनीत आणि वेगवेगळ्या आर्द्रतेच्या पर्यावरणात, भारतात उष्ण व ओसाड भागात सगळीकडे सापडते.

## औषधी गुणधर्म

पूर्ण झाड फुले आणि फळांच्या अवस्थेत जमा करून वाळवले जाते आणि त्याचाच औषध म्हणून वापर करतात. यूफोर्बिया (दुधी) लघुश्वास नलिकांमध्ये शैथिल्य आणते व हृदयाची गती श्वसन मंदावण्याची क्रिया करते. ते कृमी घालवण्यासाठी, आतड्यांच्या आजारात, दमा आणि कफावर मुलांसाठी उपयोगी आहे.

स्त्रियांच्या दूध निर्मितीसाठी व पुरवठ्यासाठी ते उत्तेजन देते. परम्यात व मूत्रप्रजनन संस्थेच्या तक्रारींवर उपयोगी आहे. या झाडाची मुळे वांत्या थांबवतात. हे औषध जास्त प्रमाणात घेतल्यास पोटात भगभग होते. आणि वांत्या व मळमळ होते. या झाडाचा दुधाळरस चामखिळीवर (वार्टस्) लावण्यात येतो. या झाडात प्रतिजैविक आणि क्षयरोगविरोधी गुणधर्म असल्याचे प्रयोगाद्वारे दाखवण्यात आले आहेत.

## इतर उपयोग

*यूफोर्बिया हिरटाची* पाने भाजीपाला म्हणून देखील खाल्ले जातात.

## इतर जाती

या प्रजातीत इतर थोड्या औषधी जाती आहेत. त्यांचे औषधी गुणधर्म मोठ्या दुधीसारखेच असल्याचे सांगण्यात येते.

*यूफोर्बिया* या प्रजातीत काही मोठ्या व क्षुप जाती त्यांच्या जाड, रसदार; कॅक्टससारख्या काटेरी, गोल किंवा विशेषरित्या कोन असलेल्या, आणि नागमोडी, पिळदार खोड व शाखांमुळे सहजगत्या ओळखल्या जातात. अशा झाडांचा पांढरा दुधाळ रस जहाल आणि विषारी असतो. या झाडाचा रस निष्काळजीपणाने हाताळल्यास



रेखाचित्र क्र. १२ काटेरी थोर (युफोर्बिया ॲन्टिक्युओरम)




रेखाचित्र क्र. १३ यूफोर्बिया नेरिफोलिया

चर्मरोग व इतर रोग होण्याची शक्यता असते. अगदी ठराविक प्रमाणात ते रेचक वगैरे म्हणून वापरले जाते. काही जातींचा रस जखमेवरील किडे मारण्यासाठी चर्मरोग आणि चामखिळीवर बाहेरून लावण्यासाठी वापरला जातो.

काटेरी थोर (*यूफोर्बिया ॲन्टिक्युओरम L*) (*आकृती १२ हिंदी - त्रिधारी सेहुंड, संस्कृत - वज्रकंटक*) यास ३-५ कोन असलेल्या फांद्या असतात आणि ही वनस्पती उष्ण भागात, भारतात सगळीकडे उगवते. तिचा रस जलोदरावर आणि मज्जासंस्थेसाठी शक्तिवर्धक म्हणून वापरला जातो. *यूफोर्बिया बार्नहार्टी Croizat syn. यूफोर्बिया ट्रायगोना Roxb. तेलुगू - काट्टिमंडु*) ही जाती दक्षिणेतील व अंदमानमधील खडकाळ, कोरड्या डोंगराळ भागात सापडते. पानांच्या पावडरचे पोटिस गळूवर वापरले जाते.

*यूफोर्बिया नेरिफोलिया L. (आ. १३ हिंदी - सेहुंड, थुहार;* संस्कृत - *स्नुहि*) या झाडाच्या शाखांना पाच कोन असतात. ते दक्षिणेत नैसर्गिक अवस्थेत उगवते, परंतु भारतात सगळीकडे कुंपणात लावले जाते. त्याचा रस कान दुखणे व दम्यावर वापरला जातो.

*युफोर्बिया नायव्ह्यूलिया Buch-Ham -(हिंदी - काटथुवार,* संस्कृत - *पत्रस्नुहि*) या झाडास लंबवर्तुळाकृती शाखा असतात आणि जवळपास भारताच्या सर्वच कोरड्या भागात ते सापडते. याचा कुंपणासाठीही वापर करतात. या झाडाचा रस लघवी सुटण्यास मदत करतो असे समजण्यात येते.

(बस्तरचे आदिवासी जनावरांच्या उपचारासाठी याचा पांढरा रस वापरतात.)

*यूफोर्बिया रॉयलियाना Boiss. (पंजाबी - दंडा थोर*) ला ५-७ धारी शाखा असतात आणि पश्चिम हिमालयाच्या बाहेरील उतरणीवर १०००-१५०० मीटर उंचीवर सापडते.

*यूफोर्बिया तिरूकॉलि* (हिंदी - *सेहुंड,* संस्कृत - *वज्रद्रुम*) हे क्षुप किंवा लहान वृक्ष असते. ही महाराष्ट्रात 'शेर' म्हणून सर्वत्र ओळखली जाते. यास पुष्कळ लंबाकृती शाखा असतात. इतर जातींपेक्षा याच्या शाखा बऱ्याच निमुळत्या असतात. ही एक आफ्रिकन जाती आहे परंतु कोरड्या भागात भारतात सगळीकडे कुंपण म्हणून व रस्त्याच्या कडेला विशेषतः दक्षिण आणि पूर्व भारतात लावली जाते. या झाडाचा पांढरा रस संधिवातावर व दाताच्या दुखण्यावर लावण्यासाठी उपयोगी समजण्यात येतो. थोड्या प्रमाणात तो आतून सुध्दा देण्यात येतो.

# ३७. हिंग

**फेरुला नारटहेक्स** Boiss.

*कुल* : अंबेलिफेरी

*भारतीय नावे* : मराठी - *हिंग*

हिंदी - *हिंग*

कानडी, बंगाली, गुजराती - *हिंग*

काश्मिरी - *यांग, सॅप*

मल्याळी - *पेरूनंगयम*

उडिया - *हेंगू*

संस्कृत - *बल्हिका, अगूडगंध*

तामिळ - *पेरूंगायम*

तेलुगू - *इंगुमो*

'हिंग' हे व्यावहारिक नाव या झाडाच्या डिंक सदृश्य पदार्थावरून देण्यात आलेले आहे.

## वर्णन

मजबूत, गाजरासारखे मूळ असलेली बहुवर्षिय औषधी. पाने दोन प्रकारची; खालील साधी, ३०-६० से. मी. लांब, अंडाकृती; वरची, बऱ्याच लहान भागात विभागलेली, कोवळी पाने दाट केसयुक्त; फुले लहान, पिवळी, मोठ्या गुच्छांमध्ये; फळ ८ मि. मी. लांब, सुमारे लांबीपेक्षा निम्मे किंवा थोडे जास्त रुंद

## वितरण

हे झाड काश्मिरमध्ये उगवते.

## औषधी गुणधर्म

हिगांच्या झाडाच्या मूलस्तंभावर किंवा मूळांवर जखमा करून हिंग हा राळेचा आणि सुगंधी पदार्थ मिळवतात. या जातीव्यतिरिक्त इतर संबंधित जातीपासूनही हा काढण्यात येतो. हिंग, बेडका काढण्यासाठी, अपचनात, पोट फुगण्यावर, कॉलरा आणि

डांग्या खोकल्यावर उपयोगी आहे. श्वसनासाठी व मज्जासंस्थेसाठी हे उत्तेजक आहे. मुलांना होणारा न्यूमोनिया आणि फुफ्फुसांच्या नळ्या सुजण्यावर परिणामकारक आहे. आतड्यांना उत्तेजित करण्यासाठी बाहेरून पोटावर लावले जाते. अन्ननलिका फुगल्यावर 'एनिमा' देण्यासाठीसुद्धा वापरण्यात येते. हिंगामध्ये काही उपशामक गुणधर्म असल्याचे प्रयोगांनी सिद्ध झाले आहे आणि त्याचा हृदयरोगावर उपयोग होत असल्याचे सूचित करण्यात आले आहे.

### इतर उपयोग

मसाला म्हणून हिंग मोठ्या प्रमाणावर वापरला जातो. डाळी आणि भाजीच्या रश्श्यांमध्ये, लोणच्यात वगैरेत तो एक महत्त्वाचा घटक आहे.

### इतर जाती

या प्रजातीत *फेरयुला नारटहेक्स*, *फेरयुला फीटिडा*, सारख्या मध्य आशियात (अफगाणिस्थान वगैरे) वाढणाऱ्या जाती *फेरयुला ॲसफीटिडा* प्रमाणेच औषधी गुणधर्म दाखवतात.

औषधासाठी आणि इतर कामासाठी हिंगाची भारतातील वार्षिक मागणी ६००० क्विंटल्स आहे. याचा नियमित पुरवठा व्हावा म्हणून हिमालयाच्या मधल्या भागात या झाडाच्या लागवडीची गरज आहे.

१२ लाख रुपयाचे हिंग १९७७-७८ साली आयात करण्यात आले.

## ३८. विंटरग्रीन

**गाउलथेरिया फ्रेग्रेटिसिमा** Wallich

*कुल :* इरिकेसीई.

*भारतीय नावे :* हिंदी - *गंधपूरका तेल*
संस्कृत - *हेमंत-हरित*
आसामी - *जिरहप*

या झाडापासून विन्टरग्रीन नावाने बाष्पीभूत तेल काढण्यात येते व त्यावरून याचे व्यावहारिक नाव विंटरग्रीन पडले आहे.

### वर्णन

३ मीटर उंचीचे सदाहरित क्षुप; खोडे बहुशाखीय, साल नारंगी-तपकिरी; पाने १३ से. मी. पर्यंत लांब, थोडी रुंद, कातडीपोताची, ग्रंथींच्या ठिपक्यानीयुक्त, काठ

दातेरी; फुले लहान, हिरवट पांढरी, खुज्या अक्षकोनातून निघणाऱ्या गुच्छात; फळ गोलाकार, निळ्या निदलात गुंडाळलेले.

## वितरण

हे झाड उत्तर, पूर्व आणि दक्षिण भारतात १५०० ते २५०० मीटर उंचीवरच्या डोंगराळ भागात सापडते.

## औषधी गुणधर्म

या जातीच्या ताज्या झाडापासून 'विन्टरग्रीन' हे बाष्पीभूत तेल काढण्यात येते.

हे तेल सर्व प्रकारच्या संधिवाताच्या उपचारात वापरण्यात येते. ते दुखण्याच्या जागेवर लावले जाते. काही मलमामुळे व चोळण्याच्या औषधामुळे होणारी चुरचुर न होण्यासाठी त्यात हे औषध घालण्यात येते. ते हुकवर्मसचा नाश करते व पोटातील वायू घालवते. या औषधात उत्तेजक गुणधर्मपण आहेत.

एक लक्षणीय गोष्ट म्हणजे हे तेल कमी प्रमाणात प्रायोगिक उंदरांना दिल्याने कर्करोगाची वाढ पुढे ढकलली गेल्याचे आढळून आले आहे. प्रायोगिक प्राण्यांमध्ये ठराविक प्रकारच्या गाठींची वाढ या औषधाने एकदम थांबली किंवा मंदावली.

## इतर उपयोग

सुगंधासाठी या तेलाचा वापर होतो. ते सौम्य पेयांमध्ये, लिंबूड्रॉप्समध्ये, टुथपेस्टमध्ये इत्यादीत वापरले जाते.

डास मारण्यासाठी किंवा माशा आणि इतर कीटकांना पळवून लावणाऱ्या अनेक औषधांत हे तेल वापरले जाते. भारतात थंड हवेच्या ठिकाणी शोभेचे झाड म्हणूनही यास लावले जाते.

# ३९. नीलकंठ

*(इंडियन जेन्शियन्)*

**जेनसियाना कुरूरू** Royle.

*कुल :* जेनसियानेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *कमळ फल, नील कंठ, कुटकि*
बंगाली - *कारू, कुटकि*
गुजराती - *परवानभेद*
काश्मिरी - *नीलकंठी*
(जौसंर - *कारू*)

इंडियन जेन्शियन हे व्यावहारिक नाव खऱ्या जेन्शियनऐवजी वापरण्यात येते.

## वर्णन

जमिनीवर अनेक खोडे एकत्र येऊन वाढणारी बहुवर्षीय औषधी, १०-३० से. मी. उंचीपर्यंत वाढणारी; खालची पाने ७-१३ से. मी. लांब एकत्र वाढलेली; वरची पाने २.५ से. मी. पर्यंत लांब, अरुंद; फुले निळी आणि पांढऱ्या ठिपक्यांनी युक्त, ४-५ से. मी. लांब, २-२.५ से. मी. परिघ असलेली, एक किंवा २-४ फुलांच्या गुच्छांमध्ये; फळ सुमारे २ से. मी. लांब.

## वितरण

हे झाड वायव्य हिमालयामध्ये १५०० आणि ३५०० मीटर उंचीवर काश्मिर व त्यालगतच्या डोंगराळ भागात सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाचे वाळवलेले मूलस्तंभ म्हणजेच औषध आहे. पचनशक्ती वाढवण्यासाठी आणि जठरातील पाचक रसांचा स्राव उत्तेजित करण्यासाठी जेनशियन वापरण्यात येते. अनेक शक्तिवर्धकात व पचन वाढवणाऱ्या औषधात ते एक घटक आहे. त्यास सुंदर सुवास व चव आहे. यास जास्त प्रमाणात घेतल्याने हगवण लागते.

### इतर जाती

*जेनशिया ल्युटिया* L. (पिवळा जेन्शियन्) ही परदेशी जाती आहे तिची मुळे औषधात फार महत्त्वाची मानली जातात आणि भारतात फार मोठ्या प्रमाणावर आयात करण्यात येतात. वायव्य हिमालयातील ३०० मीटर उंचीवरचे हवामान या जातीच्या लागवडीकरिता योग्य ठरेल असे सूचित करण्यात आले आहे. नीलकंठाच्या एक किंवा दोन जाती हिमालयात नैसर्गिक अवस्थेत सापडतात. त्यासुध्दा *जेनृशियाना* कुर्रोच्या ऐवजी वापरल्या जाऊ शकतात.

*पिक्रोऱ्हायझा* कुर्रोआ हे झाड *जेनशियाना ल्यूटियाच्या* ऐवजी वापरण्यास योग्य आहे.

जेनशियानाची भारताची वार्षिक मागणी १० क्विंटल्स आहे.

## ४०. लिकरिस

**ग्लायसिऱ्हायझा ग्लॅब्रा** L.

*कुल :* पॅपिलिओनेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *मुलेथी, मुलाथी*
बंगाली - *जष्ठिमधू*
कानडी - *यष्ठिमधुकम*
मल्याळी - *इरतिमधूरम*
संस्कृत - *मधूयष्ठी*
तेलुगू - *यष्ठिमधुळम*

लिकरिस हे व्यावहारिक नाव इंडियन लिकरिस् या नावापासून वेगळे ओळखण्यात यावे कारण ते पूर्णतः वेगळ्या म्हणजे *ॲब्रस प्रिक्रॅटोरियस्* L (गुंजा) या झाडापासून मिळते.

### वर्णन

१.५ से. मी. उंच, सरळ वाढणारी औषधी किंवा क्षुप; पाने संयुक्त, पर्णिकांच्या ४-७ जोड्या; फुले फिकट गुलाबी किंवा फिकट जांभळी, लहान, अक्षकोनातून निघणाऱ्या सडपातळ पानाबरोबरच्या किंवा त्यांच्यापेक्षा किंचित लांब कणिसांत; फळे १.३ से. मी. लांब, सपाट, सर्व बाजूंनी कंटकांनी वेढलेली; मूलस्तंभापासून जास्तीची मुळे वाढतात, मूलस्तंभाच्या आजूबाजूस भूमिगत असणारी अनेक खोडे असतात.

## वितरण

हे झाड भारतात लावले जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली मुळे आणि भूमिगत खोडे म्हणजेच औषध आहे.

कफ, घसा खवखवणे, फुफ्फुसाच्या नळ्यांना सूज येणे, पोटातील त्रास, क्षयरोग आणि अपस्मार यावर लिकरिस् उपयोगी समजण्यात येते. लिकरिस्चा थोडासा तुकडा घसा खवखवण्यावर किंवा कफावर चघळण्यात येतो किंवा ओढण्यात येतो. लिकरिस् लघवी होण्यास मदत करते तसेच प्रयोगांनी त्यात प्रतिजैविक गुणधर्म असल्याचे दिसले आहे. त्याच्या दुःख कमी करण्याच्या गुणधर्मामुळे आणि गोड चवीमुळे ते सायरपस्मध्ये कडू औषधाचा कडूपणा कमी करण्यासाठी मिश्रणात किंवा गोळ्यांमध्ये वापरले जाते; ते जठराच्या व ड्यूअडेनमच्या अल्सर्समध्ये उपयोगी आहे.

लोणी, तुपात मिसळलेली लिकरिसची पावडर कापण्यावर आणि फोडांवर उपयोगी आहे. ती त्यावर लावली जाते. पानांची पोटिस डोक्यात होणाऱ्या खवड्यांवर उपयोगी आहे.

## इतर उपयोग

या औषधाची भुकटी किंवा तुकडे सर्वसाधारणपणे विड्याच्या पानाबरोबर घेण्यात येतात.

स्थानिक उत्पादनाने या औषधाची मागणी पूर्ण होत नाही आणि यामुळेच १९७७-७८ साली तीन लाख रुपयाची कोरडी मुळे आयात करण्यात आली होती. काश्मिर, पंजाब, हिमाचल प्रदेश, उत्तर प्रदेश आणि मद्रास या झाडाच्या लागवडीस योग्य असल्याचे सूचित करण्यात आले आहे.

भारतीय वनस्पती सर्वेक्षण विभागाचे निदेशक डॉ. सांतापौ ह्यांच्याशी या झाडाविषयी चर्चा करतांना त्यांनी सांगितले की हे स्पेन व इटलीत सर्वत्र उगवणारे तण आहे. लहान मुले इथे याच्या ताज्या मुळांचे तुकडे चॉकलेटऐवजी चोखतात.

# ४१. अनंतमूळ

*(इंडियन सार्सापरिला)*

**हेमिडेस्मस् इंडिकस** (L) Schult

*कुल :* पेरिप्लोकेसाई

*भारतीय नावे :* मराठी, उडिया - *अनंतमूळ*
हिंदी - *सलसा, अनंतमूल*
बंगाली - *अनंतमूळ*
गुजराती - *धूरीवेल*
कानडी - *सोगदेबेरिनिगिडा*
मल्याळी - *नन्नारी*
संस्कृत - *नाग जिव्हा*
तामिळ - *नन्नारी*
तेलुगू - *मुत्तावपुलगमु*
(मध्य भारत - *कालिदुधी, छोटी दुधी*)

यात मिळणारे औषध सार्सापरिलाऐवजी वापरण्यात येते म्हणून यास इंडियन सार्सापरिला म्हणतात. मूळ सार्सापरिला 'स्मायलॅक्स' या प्रजातीपासून मिळते.

## वर्णन

बहुवर्षीय वल्ली किंवा रांगणारी वनस्पती, मूलस्तंभ काष्ठमय, सुवासिक; खोड सडपातळ, गुळगुळीत; पाने आकाराने व लांबी रुंदीने विविध प्रकारची, ५-१० से. मी. लांब व रुंदी ४-५ से. मी., गर्द हिरवी, बहुतकरून पांढुरक्या डागांसह, खालच्या पृष्ठभागावर फिकट किंवा पांढुरकी व केसाळ; फुले अगदी लहान, हिरवट, लहान दाट गुच्छांमध्ये; फळे १०-१५ से. मी. लांब हिरवी, अरुंद, नळकांडेकृती, अग्रास टोकदार, जोड्यांमध्ये; बिया लहान, काळ्या, टोकावर केसांच्या गुच्छासह. झाडाच्या सर्व अवयवांत दुधाळ रस असतो.

## वितरण

हे झाड भारतात जवळपास सगळीकडे सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली मुळे म्हणजे औषध आहे. हे औषध त्वचारोगावर, भूक न लागण्यावर, ल्यूकोरिया आणि इतर लघवीच्या तक्रारीवर उपयोगी आहे. लघवी होण्यासाठी या औषधाचे गुणधर्म प्रयोगाने दाखवण्यात आले आहेत. रक्ताच्या शुध्दीकरणासाठी व संधिवातावर हे औषध मोठ्या प्रमाणावर वापरले जाते. *सार्सापरिला स्मायलॅक्स* या प्रजातीच्या झाडांपासून मिळतो. याऐवजी इंडियन सार्सापरिला त्यावरील चाचण्यांमुळे वापरण्यास योग्य असल्याची खात्री पटली आहे.

## इतर उपयोग

अरुंद पाने असलेल्या झाडाची पाने चघळण्यात येतात. या जातीतील ही एक पोट जाती आहे. ही पाने उत्साहवर्धक असतात.

# ४२. दुधारी

**होलॅन्हिना ॲंटिडिसेंट्रिका** (Roth) A. DC.

*कुल :* ॲपोसायनेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *गल, दुधारी, कोदाई*
हिंदी - *इंद्रजव, कोडई, कुरची*
आसामी - *दुधखुरी*
बंगाली - *कुरची*
गुजराती - *कुडा*
कानडी - *हाले*
मल्याळी - *कोडगप्पाले*
उडिया - *खुरनी, खेडवा*
पंजाबी - *केवाड*
संस्कृत - *कुटज, कालिंग*
तामिळ - *इंद्रबन*
तेलुगू - *पालाकोडसा*
(नैनिताल - *केओडा*)

या झाडातून दुधासारखा पांढरा चिक निघतो म्हणून त्यास दुधारी म्हणतात. याचे शास्त्रीय नाव ॲन्टिडीसेन्ट्रिका आहे. याचा अर्थ ते अतिसारावर वापरले जाते. ते सुळक्यांवर किंवा पर्वत शिखरावर उगवते म्हणून त्यास संस्कृतमध्ये 'कुटज' म्हणतात. (कुट - शिखर)

## वर्णन

उंच क्षुप किंवा लहान वृक्ष, काहीवेळा १० मीटर उंच; पाने १०-३० से. मी. लांब, अंडाकृती, पातळ, ठळक शिरांनी युक्त; पानांचे देठ फार लहान; फुले पांढरी, सुवासिक, १-१.५ से. मी. परिघाची, फांद्यावर अग्राकडे मोठ्या गुच्छामध्ये; फळे सडपातळ, नळकांडेकृती, २०-४५ से. मी. लांब, ६-८ से. मी. जाड, गर्द करड्या रंगावर पांढरे ठिपके असलेली; बिया सुमारे १ से. मी. लांब, वरच्या टोकावर २-२.५ से. मी. लांबीचा तपकिरी केसांचा पुंजका असलेल्या.

## वितरण

भारतात १५०० मीटर उंचीवर सगळीकडे हे झाड सापडते. ते सामान्यतः महाराष्ट्र आणि मध्य प्रदेशातील जंगलांच्या बाहेरील बाजूस सापडते.

## औषधी गुणधर्म

झाडाची वाळवलेली साल म्हणजे दुधारी औषध आहे. आमांश झाल्यावर या औषधाचा मुख्य उपयोग होतो. नुसत्या सालीचा काढा किंवा इतर अनेक औषधात साल व रसायनांचे मिश्रण एकत्रित करून वापरण्यात येते. या झाडाच्या सालीत शक्तिवर्धक व ताप उतरवण्याचे गुणधर्म आहेत.

सालीत 'कोनेसिन' नावाचे ॲल्कलॉइड असते. यामुळे क्षयरोगाच्या जंतूंची वाढ थांबते असे दिसून आले आहे.

बियांमध्येही ॲल्कलॉइड असते. ते अतिसारात परिणामकारक आहे. पानांमध्येसुध्दा काही औषधी गुणधर्म आहेत.

## इतर उपयोग

उजाड जमिनीवर जंगल वाढवण्यासाठी हे झाड चांगले आहे. नवीन जंगलतोड झालेल्या प्रदेशात झाडे लावण्याची सुरवात करण्यासाठी ते चांगले आहे. कागदाचे चाकू, खेळणी, लहान खोके, पेन ठेवण्याचे स्टँड, कंगवे, छपाईचे ठोकळे, तंबाखूच्या पिशव्या, चित्रांच्या चौकटी इत्यादी घरगुती व किरकोळ वस्तूंसाठी या झाडाचे लाकूड चांगले असते.

# ४३. चालमोगरा

**हिडनोकार्पस कुरझिई** (King) Warb.

*कुल :* प्लॅकूर्शिअसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *चालमोगरा*
आसामी - *लमटनी*
बंगाली - *चौलमूगरा, दालमूगरी*
मल्याळी - *मरवेट्टी*

चालमोगरा हे व्यावहारिक नाव या झाडाच्या स्थानिक नावावर आधारित आहे.

## वर्णन

सुमारे १५ मीटर उंच वृक्ष, काही वेळा अधिक उंच, खोडास अनेक लोंबणाऱ्या फांद्यांनी युक्त; पाने सुमारे २० से. मी. लांब, अग्रास टोकदार, कातडी पोताची; फुले लहान, पिवळी अक्षकोनातून निघणाऱ्या लहान गुच्छांत; फळ ६-७ से. मी. परिघाचे, गोल, तपाबिया पुष्कळ.

## वितरण

हे झाड आसाम आणि त्रिपुराच्या सदाहरित जंगलांमध्ये व काही विशिष्ट ठिकाणी भरपूर प्रमाणात सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या पूर्ण वाढ झालेल्या ताज्या बियापासून तेल काढण्यात येते. ते औषधी आहे. हे तेल महारोगाच्या उपचारात वापरण्यात येते. आधी हे तेल सेवन करण्यात येत असे पण या तेलांने युक्त असलेले औषधे इंजेक्शनद्वारे देण्यात येतात. या झाडाच्या सालीमध्ये 'टॅनिनस्' असतात ती ज्वरामध्ये उपयोगी समजली जातात. *हिड्नोका कुरझिईच्या* बियांची पेंड खत म्हणून वापरण्यात येते. काही प्राणी या झाडाची फळे खातात अशा प्राण्यांचे मांस खाऊ नये असे सांगण्यात येते. चालमोगऱ्याच्या फळांमुळे जर मासे मेले तर ते मासेही खाण्यास अयोग्य समजण्यात येतात.

## इतर जाती

*हिडनोकार्सस लाउरिफोलिया* (Dennst) Sleummer syn. *हिडनो-कार्पस व्हिटियाना* Blume (मराठी - *कटु कवठ;* संस्कृत - *गरूड फळ,* तामिळ - *मरावेट्टी* हे पश्चिम घाटात मिळते. बियापासून काढलेले तेल औषधी आहे. *हिडनोकार्पस कुरझिईच्या* तेलाप्रमाणेच याचे गुणधर्म आहेत. ते महारोगात, रोगाने पछाडलेल्या भागावर लावले जाते. ते गाठीची होणारी वाढ थांबवते. संधिवाताचे दुखणे, हातपाय मुडपणे, क्षयातील गाठी, सुजणे वगैरेवर उपयोगी आहे. काही प्रयोगांमध्ये त्याचा परिणाम जीवाणू नष्ट करण्यात दाखवण्यात आला आहे.

# ४४. तालिमखाना

**हायग्रोफिला ऑरिक्युलॅटा** (Schum) Heine syn. **हा. स्पायनोसा** आणि **ॲस्टेराकॅन्था लॉंगिम्फोलिया** Nees

*कुल :* अकॅन्थसीई

*भारतीय नावे :* मराठी - *तालिमखाना*
हिंदी - *ताल्मखाना*
बंगाली - *कुलेखाडा, कल्पकाटा*
गुजराती - *एखरो*
कानडी - *कोडवंके*
मल्याळी - *वायलचुल्ली*
संस्कृत - *कोकिलाक्ष*
तामिळ - *निर्मुल्ली*
तेलुगू - *नीरूगुब्बी*

तालिमखाना हे व्यावहारिक नाव स्थानिक नावावरून घेण्यात आले आहे.

## वर्णन

६० ते १५० से. मी. उंच सरळ ताठ वाढणारी, मजबूत औषधी; खोडं चार कोन असलेली, केसाळ, फुगीर पेरावरली अधिकच चतुष्कोनी व केसाळ; पाने मंडलाकार एका पेरावर सहा, प्रत्येकाच्या अक्षकोनात अणकुचीदार पिवळा कंटक; फुले एका मंडलात आठ, जांभळी निळी, सुमारे ३ से. मी. लांब, २ ओष्ठ असलेली; खालचे ओष्ठ विशेषप्रकारे घड्या पडलेले.

## वितरण

हे झाड दलदलीच्या आणि इतर ओलसर जागी भारतात सर्वत्र सापडते, उथळ-अर्धवट वाळलेले खड्डे आणि रस्त्याच्या बाजूच्या नाल्या या वनस्पतीने गच्च भरलेल्या असतात.

## औषधी गुणधर्म

तालिमखाना हे संपूर्ण झाड मूत्रलकर औषधी आहे.

जलोदर, कावीळ, संधिवातात आणि मूत्रपिंडाच्या रोगात ते उपयोगी आहे. बिया गुप्त रोगात उपयोगी समजण्यात येतात. मूत्रवर्धक गुणधर्म या झाडात असलेल्या

अकार्बनी व कार्बनी पदार्थांच्या एकत्रितपणामुळे असल्याचे समजण्यात येते. नुसत्या बिया किंवा मुळांमध्ये सुध्दा मूत्रवर्धक गुणधर्म आहे. पाने कफ आणि मूत्रउत्सर्जनात उपयोगी आहे.

# ४५. खुरसनि ओवा

*(इंडियन हैनबेन)*

**हायोसायामस नायगर** L

*कुल :* सोल्यानेसी

*भारतीय नावे :* मराठी - *खुरसनि ओवा*
हिंदी - *खुरसनि आजावइन*
गुजराती, बंगाली - *खुरसानी, अजवायन*
संस्कृत - *पारसीकय, मदकारिणी*

## वर्णन

दुर्गंधीयुक्त, वार्षिक किंवा द्विवार्षिक औषधी, दाट ग्रंथी रोमांनी आच्छादलेली; खोड १ मीटरपर्यंत उंच; खालची पाने १५-२० से. मी., कडा दातेरी; वरची पाने लहान व अनेक भागात विभागलेली; फुले २-३ से. मी. परिघाची, फिकट हिरवी आणि जांभळ्या रेघोट्यांनीयुक्त, काही एक एक फांद्यांच्या जागेवरून खोडावर लागणारी, इतर लांब अग्राच्या कणिसात; फळ १.३ से. मी. परिघाची, गोल.

## वितरण

हे झाड सर्वसाधारणपणे पश्चिम हिमालयात १५०० ते ३००० मीटर उंचीवर काश्मिरपासून ते गढवालपर्यंत, वस्तीजवळ आणि ओसाड जागी सापडते. भारताच्या अनेक भागांत (उदा. काश्मिर, पंजाब, उत्तर प्रदेश, महाराष्ट्र आणि निलगिरी पर्वतात) ते लावले जाते.

## औषधी गुणधर्म

वाळवलेली पाने आणि फुले आल्यावर फुलांचे शेंडे जमा करण्यात येतात यासच ''हायोसायामस्'' किंवा खुरसनि ओवा म्हणतात.

या औषधात बेलाडोनासारखेच (*अट्रोपा बेलाडोना*) औषधी गुणधर्म आहेत. स्नायूंच्या वेदनांवर, हिस्टेरियासारख्या मज्जा संस्थेच्या त्रासात आणि कफ वगैरेत ते गुणकारी आहे. डोळ्यांचे बुबुळ याने विस्तार पावते.

या झाडाच्या बियांमध्येसुध्दा औषधी गुणधर्म आहेत. सामन्यतः त्या त्रासाच्या जागी चिकटवण्यात किंवा लावण्यात येतात.

भारतातील या औषधाची वार्षिक मागणी ४० क्विंटल्स आहे. हे झाड हिमालयात काश्मिर, पंजाब, हिमाचल प्रदेश आणि उत्तर प्रदेशात लावले जाऊ शकते.

## इतर जाती

*हायोसायामस म्यूटिकस L. (इजिप्शियन हेनबेन) हे काश्मिर आदी ठिकाणी लावले जाते. या जातीत अॅल्कलॉईडचे प्रमाण इंडियन हेनबेनपेक्षा जास्त आहे; त्यात जास्त तीव्र गुंगी आणणारा गुणधर्म आहे. (इजिप्शियन हेनबेनची पाने कैफ येण्यासाठी ओढली जातात. भारताची हेनबेनची मागणी या दोन जातींच्या लागवडीचे क्षेत्र वाढवल्याने पूर्ण करता येऊ शकेल.*

# ४६. नीलपुष्पी

***आयपोमिया निल** (L.) Roth syn. **आ. हेडेरासीया** auct. non. Jacq.* ***आकृती १४***

*कुल :* कनव्हाल्युलेअसीई

*भारतीय नावे :* मराठी - *नीलपुष्पी*
हिंदी - *कालादाना, नील-कलमी*
बंगाली, गुजराती - *कालादाना*
गुजराती - *कालाकुंपान*
उडिया - *कणिखोंडो*
संस्कृत - *कृष्णबीज*
तामिळ - *सिरिक्की*
तेलुगू - *तीरीकि*
(नैनिताल - *भोरड*)

या झाडाचे नीलपुष्पी हे व्यावहारिक नाव याच्या निळ्या रंगाच्या फुलांवरून देण्यात आलेले आहे.

## वर्णन

वर्षायू वल्लरी, खोडे विरळ केसांनी आच्छादलेली; पाने ५-१२ से. मी. परिघाची, अंडाकृती, उथळ किंवा खोलवर पर्णछेदाने ३ भागांत छेदलेली; फुले ४-५ से. मी. लांब, नरसाळ्याच्या आकृतीची, निळी, खाली किंचित नारंगी रंगाची, लहान पुष्पबंधाक्षावर, थोडी, गुच्छांमध्ये एकत्र लागतात; फळ ८ मि. मी. परिघाचे, जवळपास



रेखाचित्र क्र. १४ नीलपुष्पी (आयपोमिया निल्)



रेखाचित्र क्र. १५ आयपोमिया पेस्टीग्रिडिस




रेखाचित्र क्र. १६ आयपोमिया अक्वॅटिका




रेखाचित्र क्र. १७ आयपोमिया पेसकाप्री

गोलाकार किंवा अंडाकृती. बिया लहान गुळगुळीत. फुलांच्या रंगाबाबत एक मनोरंजक गोष्ट अशी की झाडावर असेपर्यंत फुले निळी असतात आणि झाडावरून तोडल्यावर काही मिनिटांतच ती जांभळी होतात. यामुळेच अनेक पुस्तकांत या झाडाच्या फुलांचा रंग जांभळा लिहिलेला आढळतो.

## वितरण

हे झाड भारतात १८०० मीटर उंचीवर सापडते. अधून मधून ते मुद्दाम लावलेही जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या वाळवलेल्या बिया म्हणजेच औषध आहे. नीलपुष्पी रेचक म्हणून वापरण्यात येते. जास्त प्रमाणात घेतल्याने या औषधाने क्षोभ होतो.

## इतर उपयोग

या झाडाची ताजी फळे भाजीपाला म्हणून वापरण्यात येतात. या झाडास लागणाऱ्या सुंदर फुलांसाठी हे झाड लावण्यात येते.

## इतर जाती

*आयपोमिया* या प्रजातीच्या इतर अनेक औषधीही आहेत. जवळपास या सगळ्या जातींमध्ये रेचक गुणधर्म आहेत. उदा. *आयपोमिया पेस्टिग्रिडिस* L. (आकृती १५ हिंदी - *घियाबटी, कालादाना, पंचतंत्री,* मध्य प्रदेश - *बडी पासवी.*) ची मूळ *आयपोमिया अक्वॅटिका* Forsk (आकृती १६ *स्वाम्प कॅबेज,* हिंदी - *कलमीशाक,* पंजाबी - *सोनार्लीका साग*) या झाडाचा व खालील संपूर्ण झाडांचा रस, *आयपोमिया पेसकाप्री* (L) Sweet. (आकृती. १७ हिंदी - *दो पातीलता*), *आयपोमिया परप्यूरिया* (L) Roth. (मॉर्निंग ग्लोरी), *आयपोमिया क्वामोक्लिट* L. (इंडियन पिंक, हिंदी - *काम लता,* बंगाली - तोरूलता आणि *आयपोमिया यूनिफ्लोरा* Roem & Schult) रेचक समजण्यात येतो. *आयपोमिया अक्वॅटिका* या झाडाची फुले ठेचून त्याचा रस सुजलेल्या डोळ्यात घालतात.)

*आयपोमिया परगा* Heyne (आता *एक्झोगोनियम परगा* Benth या नावाने ओळखले जाते.) या झाडाची घनकंदे रेचक आहेत. हे मूळचे अमेरिकन झाड आहे. हे झाड शोभेसाठी किंवा इतर कारणांसाठी, विशेषतः दक्षिण व पूर्व भारतात अनेक जागी बागेत लावले जाते. याची भारतातील वार्षिक मागणी सुमारे ६ क्विंटल्स आहे. या जातीऐवजी भारतीय जाती समाधानकारकरित्या वापरल्या जातात.

# ४७. मेंदी

**लाउसोनिया इनर्मिस** L. syn. **ला. अलबा** L.

*कुल :* लिथ्रेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *मेंदी*
हिंदी - *मेहंदी*
बंगाली - *मेहंदी*
गुजराती - *गेहंदी*
कानडी - *मैलांची, गोरंटी*
काश्मिरी - *मोहुज*
मल्याळी - *मैलांची*
उडिया - *बेंजाति*
पंजाबी - *हिना*
संस्कृत - *रक्तगर्भा, मेंदिका*
तामिळ - *मुल्लुगोरांटला, मारिथोंडी*
तेलुगू - *गोरंटी*

या औषधाचे हीना हे व्यावहारिक हिंदी नाव हिना या अरेबिक शब्दावर आधारित आहे.

## वर्णन

मध्यम किंवा मोठ्या आकाराचा, बहुशाखीय क्षुप, काही वेळा वृक्षासारखा; शाखा ४ कोन असलेल्या आणि अग्रास टोकदार; पाने संमुख, २-३ से. मी. लांब, बहुधा तीक्ष्ण - टोकदार; फुले लहान, पांढरी किंवा गुलाबी, सुवासिक, टोकास आलेल्या मोठ्या गुच्छांमध्ये; फळ लहान, वाटाण्याच्या आकाराचे, गोल; बिया विपुल

## वितरण

हे झाड भारताच्या अनेक भागात मुख्यतः द्विपकल्पासारख्या कोरड्या भागात, परंतु सामान्यपणे कुंपणात लावले जाते. व्यापाराच्या दृष्टीने पंजाब, गुजराथ, मध्य प्रदेश आणि राजस्थानमध्येही लावले जाते.

## औषधी गुणधर्म

झाडाच्या पानात औषधी गुणधर्म आहेत. पाने तुरट असतात आणि चर्मरोगांवर प्रतिबंधक उपाय म्हणून वापरण्यात येतात. शिवाय वाटलेली पाने गळूवर, पोळण्यावर

आणि त्वचेच्या रोगात दुःखाच्या ठिकाणी लावण्यात येतात. पानांचा काढा घशातल्या जखमांवर चुळ भरण्यासाठी वापरण्यात येतो. भारतात सामान्यतः पाने वाटून डोके दुखी, पायाची आग वगैरेवर मोठ्या प्रमाणावर वापरली जातात.

क्षयाविरुध्द, इतर जीवाणूंविरुध्द, मुदतीच्या तापात आणि रक्तस्रावात पानांची क्रिया होते तथापि या प्रकारे पानांचा अजून म्हणावा तसा उपयोग करण्यात येत नाही. या झाडाची साल, बिया यांचा उपयोग आयुर्वेद आणि युनानी औषधीतही सांगण्यात येतो.

### इतर उपयोग

मेंदीच्या झाडाचा मुख्य उपयोग हाताचे तळवे, नखे, पायाचे तळवे, पंजे, केस, दाढी आणि प्राण्यांची अवयवे व शेपट्या रंगवण्यासाठी करण्यात येतो. मेंदीचा उपयोग इतर नैसर्गिक रंगाबरोबर मिसळून मोठ्या प्रमाणावर केस रंगवण्यासाठी व कापड रंगवण्यासाठीसुध्दा करण्यात येतो.

या झाडाच्या फुलांपासून काढलेले तेल सुगंधी वस्तूंमध्ये व अत्तरात वापरण्यात येते.

## ४८. देवनाल

**लोबेलिया निकोशियानिफोलिया** Hene ex Roth.

*कुल :* लोबेलिअेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *देवनाल*
हिंदी - *नरसल*
बंगाली - *बनत माकू*
गुजराती - *नाली*
कानडी - *काडूहोगेसोप्पेल*
तामिळ, मल्याळी - *काटटूपुकैला*
संस्कृत - *बिभीषण, देवनाल*
तेलुगू - *अदारिपोगकू*

### वर्णन

मोठी औषधी; खोड मजबूत, पोकळ, ३-५ मीटर उंच, अधूनमधून वरच्या भागात शाखीय; पाने फार मोठी, खोडाच्या खालची पाने ४५ से. मी. पर्यंत लांब, वर लहान, कडा साध्या, व्यतिरिक्त; पानांची मुख्य शिर पांढुरकी; फुले मोठी पांढरी, अग्रास

फार मोठ्या गुच्छांमध्ये; फळ ८ मि. मी., गोलाकार बिया पुष्कळ, लहान, पिवळसर-तपकिरी

## वितरण

हे झाड भारताच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पी डोंगराळ भागात व त्या लगतच्या सपाट मैदानी भागात सापडते.

## औषधी गुणधर्म

ऑक्टोबर ते नोव्हेंबर महिन्यात या झाडाचे जमिनीवरील सर्व भाग जमा करण्यात येतात आणि सावलीत वाळवले जातात. हेच या झाडाचे औषध आहे.

या औषधाचे गुणधर्म जवळपास 'निकोटिन' या औषधासारखेच आहेत. ते फुफ्फुसांच्या नळ्यांना येणाऱ्या सुजेवर, दम्यावर वापरले जाते. या औषधाने घाम येतो, मळमळ वाटते आणि शेवटी वांत्या होतात, यामुळे दम्यात आराम वाटतो. हे औषध जर वांत्या होऊन बाहेर पडले नाही तर काहीवेळा धोकादायक असून विषारी ठरू शकते व त्यामुळे मृत्यूसुध्दा येऊ शकतो.

यातील 'लोबेलिन' नावाचे अॅल्कलॉइड श्वसनात उत्तेजन देते. मादक पदार्थाच्या जास्त सेवनाने किंवा गुंगी आणणाऱ्या औषधामुळे जेव्हा श्वसन बंद पडते तेव्हा ते नियमित करण्यासाठी या औषधाचा उपयोग करण्यात येतो. देवनालच्या जमिनीवरील वायवीय भागापासून पांढरा रस निघतो. या रसामुळे शरीराच्या कातडीवर फोड येतात.

कदाचित वाळवलेल्या झाडामुळेच लांबूनसुध्दा नाक, कान आणि घशाच्या आतील त्वचेत आग होते.

यामुळे झाडे जमा करणारे मजूरही ज्या भागात ही झाडे असतात तिथे जाण्याचे टाळतात.

## इतर जाती

*लोबेलिया इनूफ्लॅटा* हे मूळचे अमेरिकेतील झाड भारतात लावण्याचे प्रयत्न करण्यात येत आहेत. द्वीपकल्पी भारत आणि आसाम हे प्रदेश या झाडाच्या लागवडीस योग्य असल्याचे सांगण्यात येते. लोबेलियापासून निघणारे 'लोबलिन्' भारतात आयात करण्यात येते. तथापि भारतीय जातींचे वर सांगितलेले लोबेलिया औषध *लोबेलिया इनफ्लॅटाच्या* ऐवजी वापरण्यास योग्य आहे.

*लोबेलिया* या औषधाची भारतातील वार्षिक मागणी ५० क्विंटलस आहे.

इतर काहीं कमी औषधी महत्त्व असलेल्या जाती भारतात नैसर्गिक अवस्थेत सापडतात पण त्या फारशा वापरल्या जात नाहीत.




रेखाचित्र क्र. १८ मोह (मधुका इंडिका)

# ४९. मोह (मधुका)

**मधुका इंडिका** Gmel. syn. **बॅसिया लॅटिफोलिया** Roxb. **आकृती १८**

*कुल :* सॅपोटेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *मोह*
हिंदी - *महुआँ, महुआँ*
बंगाली - *महुआँ*
गुजराती - *महुदो*
कानडी - *इप्पे*
मल्याळी - *पूनम*
उडिया - *मोहुका*
संस्कृत - *मधुका, वनप्रस्थ*
तामिळ - *इलुप्पाई*
तेलुगू - *इप्पा*
(सन्ताळ - *मातकोम*)

या झाडाचे शास्त्रीय नाव संस्कृत नावावरून घेण्यात आलेले आहे.

वनप्रस्थ हे नाव प्राचिन साहित्यात सापडते. याचा अर्थ जंगलात उगवणारे झाड हा आहे.

## वर्णन

काहीशा खुज्या खोडाचा, मोठा पानझडी वृक्ष पण छत्रासारख्या शाखा पसरलेल्या; पाने १२-२५ से. मी. लांब, जाड, कातडी पोताची, अग्रास टोकदार; शिरा बऱ्याच ठळक; फुले लहान, रसदार, फिकट किंवा फिकट पांढरी, शाखाच्या टोकाजवळ गुच्छांमध्ये, पुष्पवृंत खाली वाकलेले, तपकिरी केसांनी आच्छादलेले तीव्र कस्तुरीचा सुगंध असलेली, सकाळी जमिनीवर पडणारी; फळ २.५ ते ५ से. मी. लांब, रसाळ, हिरवट; बिया १-४ तपकिरी, चमकदार, २.५ ते ३.५ से. मी. लांब.

## वितरण

भारतात १२०० मीटर उंचीवर जवळपास सर्वच सपाट मैदानी प्रदेशात अ कमी उंचीच्या डोंगरात सापडते. ते हिमालयाच्या खालच्या झाडीच्या पट्ट्यामधल सर्वसामान्य झाड आहे. काही ठिकाणी तर जंगलाच्या झाडीचा मुख्य भाग आहे.

## औषधी गुणधर्म

मोहाच्या झाडाची साल, पाने, फुले आणि बिया औषधी म्हणून वापरली जातात.

सालीचा काढा खरूज, हिरण्यांमधून रक्त येणे आणि क्षत बरे करण्यासाठी लावले जाते. मधुमेहात ते सेवन करण्यात येते.

पाने तुरट, जखम भरून काढणारी आहेत. त्यांची लोणी (तूप) मिश्रित राख भाजण्यावर आणि जखमांवर लावण्यात येते.

फुले कफावर व श्वासनलिका सुजण्यावर वापरतात, ती थंड आणि पोषक आहेत. फुलापासून तयार केलेले स्पिरिट शक्तिवर्धक व पोषक समजण्यात येते. फुले काही प्रकारच्या जीवाणू विरोधी गुणधर्मांनी युक्त असल्याचे समजण्यात येते.

बिया स्तनामध्ये दूध व त्याचा प्रवाह वाढवतात. बियांपासून काढलेले तेल त्वचारोगावर व रेचक म्हणून वापरण्यास उपयोगी आहे.

## इतर उपयोग

मोहाची फुले कच्ची किंवा शिजवून खाण्यात येतात. त्यांचा जास्त वापर केल्यास दुष्परिणाम होतात. ऑल्कहॉल, सिकरा, सरबते, मुरंबा वगैरे तयार करण्यात मोठ्या प्रमाणावर वापरली जातात.

साबण तयार करण्यात, स्वयंपाक वगैरेत मोहाचे तेल मोठ्या प्रमाणावर वापरले जाते. मोहाची पेंड खत म्हणून वापरण्यात येते. कधी कधी ती पाळीव जनावरांना खाऊ घालतात. टेनिस कोर्टवर या तेलाचे लेपन शिदोडांचा नायनाट करण्यासाठी वापरण्यात येते. लाकूड अनेक किरकोळ कामासाठी वापरण्यात येते.

## इतर जाती

या प्रजातीची *मधुका लाँगिफोलिया* (Koening) Macb. (जुने नाव *बॅसिया लाँगिफोलिया* Koening) ही जाती भारतीय द्वीपकल्पात सापडते आणि *मधुका इंडिका* याच स्थानिक नावाने ओळखली जाते. झाडाच्या संपूर्ण अवयवांचे गुणधर्मसुध्दा मधुका इंडिकासारखेच आहेत आणि भारतीय औषध कोषात या दोन्ही झाडांची औषधे आणि उत्पादने खात्रीलायक म्हणून नोंदवली गेली आहेत.

# ५०. शेंदरी

**मॅलोटस फिलिपेन्सिस** (Lamk) Muell - Arg.

*कुल :* यूफोर्बियेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *शेंदरी*
हिंदी - *कामेला, शेंदुरी, रोहिणी*
आसामी - *गंगइ*
बंगाली - *कमला, सइनी*
गुजराती - *कपिला*
कानडी - *केसलई, रोणती*
मल्याळी - *कपीला*
उडिया - *कमलगुंडी*
संस्कृत - *शेंदुरी, कामेला*
तामिळ - *कपिलपोडी*
तेलुगू - *कुंकुम*
(बिहार - *सिंगभूम गसर्ब,* तिन्नेवल्ली - *कालुपत्ती)*

शेंदरी रंगाच्या फळाच्या आवरणामुळे यास शेंदरी म्हणून संबोधण्यात येते.

## वर्णन

लहान किंवा मध्यम आकाराचा सदाहरित वृक्ष, काही वेळाच फक्त बहुशाखीय क्षुप; कोवळे भाग बारीक लाल, दाट केसांनी व्यापलेले; पाने एकांतरित, लांब पर्णवृंतावर, विविध आकाराची, ७-२० से. मी. लांब, खालच्या बाजूवर तांबुसआरक्त रंगाच्या ग्रंथीमुळे ठिपकेदार दिसते, शिरा ठळक; फुले लहान पुपुष्प आणि स्त्रीपुष्प वेगवेगळ्या झाडांवर; स्त्रीपुष्प ५ ते ८ से. मी. लांब सरळ ताठ कणिसात; पुपुष्प पिवळे ८ - १५ से. मी. लांब, लोंबणाऱ्या शाखांवर; फळ ८-१० मि. मी. गोलाकार परंतु त्रिपाळिक, दाटपणे तांबुसआरक्त भुकटीसारख्या पदार्थांनी युक्त, केसांनी आच्छादलेले, भुकटी सहजपणे पुसली जाते.

## वितरण

शेंदरीची झाडे भारतात उष्ण प्रदेशात; हिमालयाच्या १५०० मीटर उंचीपासून ते दक्षिणेतल्या केरळपर्यंत सगळीकडे मिळतात.

## औषधी गुणधर्म

फळांपासून बाजूला काढलेल्या ग्रंथी आणि केसाळ पदार्थ औषध म्हणून वापरतात.

शेंदरीचा मुख्य उपयोग पट्टकृमी नष्ट करण्यासाठी होतो. दूध किंवा दह्यासोबत शेंदरीची भुकटी घेतली जाते. शेंदरीच्या एका मात्रेत जर कृमी बाहेर पडले नाही, तर दुसरी मात्रा देण्यात येते. काहीवेळा मेलेले कृमी बाहेर काढण्यासाठी एरंडाच्या तेलाच्या एका मात्रेचीपण गरज असते. शेंदरी रेचक गुणधर्मयुक्त आहे. ते त्वचारोगात, नायट्यात आणि खरूजेत औषधोपचारात बाहेरून लावले जाते.

गर्भधारणाविरोधी मुखातून घ्यायचे औषध म्हणून फळांवरील केसांचे परीक्षण मादी उंदरावर व गिनिपिगमध्ये केले असता त्यांच्यात प्रजनन क्षमता कमी झाली.

## इतर उपयोग

सुप्रसिध्द असलेला कपडे रंगवण्याचा कामेला रंग याच झाडापासून मिळतो.

बियांपासून काढलेले तेल पेन्ट्स, वार्निशेसमध्ये व इतर अनेक मार्गांनी वापरले जाते. या तेलात चांगल्या तऱ्हेने लवकर वाळण्याचा गुणधर्म असल्याने पेन्टिंगच्या कामात त्यास महत्त्वपूर्ण आणि बरीच मोठी मागणी आहे.

या झाडाचे लाकूड किरकोळ घरगुती वस्तूंसाठी आणि जाळण्यासाठी वापरण्यात येते. ते काड्यापेट्या बनवण्याकरिता योग्य आहे. पाने चारा म्हणून वापरता येतात. बियांची पेंड खत म्हणून वापरण्यात येते. या झाडाच्या सालीत 'टॅनिन' असते ते कातडी कमावण्यासाठी वापरण्यात येते.

काही भाषांमधल्या या झाडाच्या स्थानिक नावाप्रमाणे, शेंदरीची तांबडी पावडर स्त्रिया कुंकू म्हणून वापरतात.

# ५१. पुदीना

**मेंथा स्पीशीज**

*कुल* : लेबिएटीई

*भारतीय नावे :* बहुधा मेन्था या जातीची स्थानिक भारतीय नावे पुदीना या शब्दावरून घेण्यात आलेली आहेत किंवा पुदीना नावाने ओळखली जातात. मेन्था या प्रजातीतील झाडे सुवासिक औषधी आहेत, अनेक जाती नैसर्गिकरित्या उगवतात; काही लावली जातात. या झाडातील महत्त्वाचे घटक 'मेन्थाल' व पेपरमिंट ऑइल आहेत आणि त्यासाठीच ही झाडे महत्त्वपूर्ण मानली जातात.

*मेन्था आरव्हेनसिस* L. (इंग्रजी - *फिल्ड मिंट, कार्न मिंट;* भारतीय नाव *पुदीना.*)

ही ताठ, सरळ ६० से. मी. पर्यंत वाढणारी, बहुशाखीय औषधी आहे; पाने ५ से. मी. पर्यंत लांब; पर्णवृंत लहान किंवा जवळ जवळ नसलेले, कडा दातेरी; फुले लहान, गुलाबी पानांच्या अक्षकोनातील लहान गुच्छांमध्ये.

ही औषधी १५०० ते ३००० मीटर उंचीवर काश्मिरमध्ये सापडते. ती मुद्याम लावलीसुध्दा जाते.

या झाडाच्या पानांचा काढा संधिवाताच्या दुखण्यावर आणि अपचनावर वापरण्यात येतो.

या झाडाचा जपानी प्रकार (*मेन्था आरव्हेनसिस* L. उपजाती *हॅपलोकॅलीक्स* Briq. var. *पायपरआस्सेन्स* Holmes) जम्मू आणि काश्मिरमध्ये लावण्यात आला आहे. या झाडापासून जे तेल काढतात त्यास जापानीज् पेपरमिंट ऑइल या व्यापारिक नावाने संबोधण्यात येते. हे खऱ्या पेपरमिंट तेलाऐवजी वापरण्यात येते. ते *मेन्था पाइपेरिटा* या झाडापासून मिळते.

*मेन्था लाँगिफोलिया* (L.) Huds. (Syn. *मेन्था सिलव्हेस्ट्रिस* L., इंग्रजी *हॉर्समिंट,* हिंदी - *जंगली पोदीना,* पंजाबी - *कोशु*) ही एक मोठी औषधी आहे. ती काश्मिर, उत्तर प्रदेश व पंजाबच्या उत्तरेस सापडते. हे झाड पूतिनाशक, उत्तेजक समजण्यात येते ते पचनाच्या तक्रारीत आणि ज्वरात उपयोगी आहे.

## खरे पेपरमिंट

या समूहाचे अतिमहत्त्वाचे झाड *मेन्था पायपेरि-* L. (इंग्रजी - *पेपरमिंट,* पंजाबी - *विलायती पुदीना*) आहे. हे भारताच्या अनेक भागात उदा. काश्मिर, म्हैसूर, मद्रास वगैरे ठिकाणी लावले जाते.

वाळवलेली पाने आणि फुले असलेल्या फांद्या म्हणजे पेपरमिंट औषध आहे. पोटदुखी, वांत्या होणे, हगवण लागणे आणि मळमळ यावरच्या उपचारात हे औषध वापरले जाते. डोकेदुखी आणि इतर दुखण्यावर याची पाने चोळून लावली जातात.

या औषधाचा पेपरमिंट तेल (ज्यात मेंथाल असते) काढण्याकरिता मुख्य उपयोग होतो. या तेलाचा वापर पोटाच्या विकारात, डोकेदुखीवरच्या बाममध्ये, संधिवाताच्या व इतर वेदनात, कफड्रॉप्स्मध्ये, पडशावर नाकात ओढण्यासाठी, गुळण्या करण्यासाठी असलेल्या औषधात याचा मोठ्या प्रमाणावर वापर होतो. हे पूतिनाशकसुध्दा आहे.

३ लाख रुपयाचे पेपरमिंट ऑइल १९७६-७७ साली आयात करण्यात आले.



सिंबोपोगॉन



खुरसनि ओवा (हायोसायामस नायगर)



सर्पगंधा ( राउवोल्फिया सर्पेंटिना )



पितकारी ( अनंतमूळ )    (टायलोफोरा इंडिका)



भुईरिंगणी (सोल्यानम् सुराटेन्स)



गुळवेल (टिनोस्पोरा कॉर्डिफोलिया)

# ५३. तुळशी

**ऑसिमम सँक्ट्म** L.

*कुल :* लेबिएटीई

*भारतीय नावे :* मराठी - *तुळस, तुळशी*
हिंदी - *तुलसी*
बंगाली, गुजराती - *तुलसी*
कानडी - *विष्णु तुलसी*
मल्याळी - *त्रित्ताव*
संस्कृत - *मंजरी, कृष्ण तुलसी*
तामिळ, तेलुगू - *तुलसी*

## वर्णन

हे भारतीयांचे प्रसिध्द आणि पवित्र झाड आहे. ती बहुशाखीय ताठ-सरळ, ७५ से. मी. पर्यंत वाढणारी औषधी आहे, सर्व अवयव केसयुक्त; पाने संमुख, सुमारे ५ से. मी. लांब, कडा दातेरी किंवा साध्या, वरच्या व खालच्या पृष्ठभागावर केसाळ, बारिक ग्रंथीच्या ठिपक्यांनीयुक्त, सुवासिक; फुले लहान, जांभळट किंवा तांबुस-आरक्त, लहान दाट, गुच्छ, सडपातळ कणिसात; फळे लहान; बिया पिवळसर किंवा तांबुस-आरक्त.

## वितरण

हे झाड भारतात सगळीकडे, घरांमध्ये, बागामध्ये आणि मंदिरांमध्ये लावले जाते. बऱ्याच जागी ते जंगली स्वरूपातही उगवते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची पाने आणि बिया औषधी आहेत. पानांपासून काढलेल्या तेलात जीवाणू व कीटाणू नष्ट करण्याचा गुणधर्म आहे. पानांचा काढा किंवा रस फफ्फुसाच्या नळ्या सुजण्यावर, पडशावर, पचनाच्या विकारात उपयोगी आहे. ते त्वचारोगांवर व नायट्याच्या जागी लावण्यात येते. पानाच्या रसाचे थेंब कर्णशूल थांबवण्यासाठी कानात टाकण्यात येतात. पानांचा काढा घरगुती उपाय म्हणून सर्दीपडशासाठी नेहमी वापरण्यात येतो. बिया मूत्रउत्सर्जनसंस्थेच्या रोगांवर उपयोगी आहेत. मलेरियाच्या ज्वरात घाम येण्यासाठी तुळसीच्या मुळांचा काढा देण्यात येतो.

# ५२. जटामांसि

*(स्पाइकनार्ड)*

**नार्डोस्टॅकिस ग्रॅंडिफ्लोरा** DC. syn. **ना. जटामांसी** DC.

*कुल :* व्हॅलेरीयानेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *जटामांसि*

बंगाली, गुजराती - *जटामांसि*

काश्मिरी - *भूतजट*

संस्कृत, तामिळ, तेलुगू - *जटामांसि*

जटामांसि हे या झाडाचे व्यावहारिक नाव भारतीय नावांवरून घेण्यात आलेले आहे.

## वर्णन

सुमारे ६० से. मी. उंच वाढणारी बहुवर्षीय औषधी, मूलस्तंभ काष्ठमय, लांब गळालेल्या पानांच्या देठाच्या धाग्यांनी आच्छादलेला; खालची पाने सुमारे २० से. मी. लांब, अरुंद होत पर्णवृंताकडे त्यात मिळणारी, वरची पाने बरीच लहान, बहुतेक अंडाकृती; फुले लहान लहान गुच्छांमध्ये, पुष्कळ; फळ लहान लहान केसांनी झाकलेलं.

## वितरण

हे झाड हिमालयात ३००० ते ४५०० मीटर उंचीवर पूर्वेकडे ते भूतानच्या उंच पर्वत रांगात मिळते.

## औषधी गुणधर्म

या झाडाचे वाळवलेले मूलस्तंभ व मूळे औषधी आहेत.

जटामांसीमध्ये पौष्टिक, काही प्रकारच्या फिटसविरोधी आणि उत्तेजक गुणधर्म आहेत. ते आचके येण्यावर आणि हृदयाच्या धडधड करण्यावरच्या औषधोपचारात वापरण्यात येते. ते रेचक म्हणून तसेच मूत्रवर्धक, मासिक पाळी आणि पचन सुधारण्यासाठी वापरले जाते.

व्हलेरियन (*व्हॅलेरियाना ऑफिसिनॉलिस्* L.) या औषधाच्या जागी जटामांसीचा उपयोग करण्यात येतो.

भारताची या औषधाची एकूण मागणी २० क्विंटल्स आहे. हिमालयातील उंच ठिकाणे जटामांसीच्या लागवडीस योग्य समजण्यात आली आहेत.

## इतर उपयोग

हिंदू देवदेवतांच्या पूजेसाठी हे झाड आवश्यक मानले जाते.

## इतर जाती

*ऑसिमम कॅनम* Sims (इंग्रजी - *होअरी बॅसिल*, हिंदी - *काली तुलसी, राम तुलसी, भरभरी*) भारतात सर्वसाधारणपणे वस्त्यांजवळ, शेतीत आणि ओसाड जागेवर बहुतेक सगळीकडे सापडते. त्याच्या बिया काळ्या आहेत. या पौष्टिक व मूत्रविरेचक समजण्यात येतात. या झाडाच्या पानांपासून काढलेल्या तेलाचे गुणधर्म ऑसिमम सँक्टम्च्या तेलासारखेच आहेत.

*ऑसिमम बसिलिकम* L. (इंग्रजी - *स्वीट बॅसिल*, हिंदी - *बुबई तुलसी, सबजा*, संस्कृत - *मंजरिकी*, तामिळ - *करपूर तुलसी*) वायव्य भारतात नैसर्गिक अवस्थेत सापडते व इतर भागात ते लावले जाते. हे झाड ज्वर, कफ (खोकला), कृमी, उदराचे विकार आणि गाठींवर उपयोगी आहे. पानांचा रस नासिका आणि त्वचारोगावर उपयोगी आहे. बियांच्या सेवनाने बध्दकोष्ठता व मूळव्याध बरी होते. पूर्व आफ्रिकेतील या प्रजातीची एक विदेशी जाती *ऑसिमम किलिमंडशारीकम* Guerke (कँफर बॅसिल) पासून मिळणाऱ्या कापरासाठी हल्ली बरीच प्रसिध्द पावले आहे. ती भारतामध्ये काश्मिर, उत्तर प्रदेश, पश्चिम बंगाल, महाराष्ट्र, म्हैसूर, मद्रास आणि केरळात लावली जाते १००० मीटर उंचीवर असलेले प्रदेश या झाडाच्या लागवडीस योग्य समजण्यात येतात. उत्तर प्रदेशातील तराई भाग यासाठी अतिशय योग्य आहे. कापूर मुख्यतः दुखण्याच्या व मुडपण्याच्या बाहेरून लावायच्या औषधात मोठ्या प्रमाणावर वापरण्यात येतो.

कापूराचे अनेक किरकोळ उपयोग आहेत आणि त्याची भारतातील वार्षिक मागणी ४००,००० क्विंटल्स आहे. काही अंशी ही भारतातील वनस्पतीपासून व काही अंशी आयात पूर्ण करून पूर्ण करण्यात येते.

# ५४. निशोत्तर

*(भारतीय जलाप)*

**ओपेरक्युलीना टरपेथम** (L.) Silva Manso = **मेरेमिया टरपेथम** (L.) Shab & Bhatt

*भारतीय नावे* : मराठी - *निशोत्तर*
हिंदी - *निसोथ*
बंगाली - *दूधिया-कलमी*
गुजराती - *नशोत्तर*
कानडी - *बिलतिगिडे*
पंजाबी - *निसोथ*
संस्कृत - *कालपर्णी*
तामिळ - *शिवदई*
तेलुगू - *तेलतेगडा*

## वर्णन

दुधाळ रसाची मोठी, वल्लरी औषधी; मूळ लांब, शाखीय, रसदार; खोड सपक्ष; पाने ४-१० x १.५-७ से. मी. अंडाकृती, हृदयाकृती; फुले पांढरी, ४-५ से. मी. लांब, नरसाळ्याच्या आकाराची, थोड्या फुलांच्या गुच्छांमध्ये; निदल सुमारे २ से. मी. लांब, परंतु झाडावर फळ लागल्यावर तो फळाभोवती ठिसूळ आवरण तयार करतो.

## वितरण

भारतात १००० मीटर उंचीवर हे झाड जवळपास सगळीकडे सापडते. काहीवेळा त्यांच्या देखण्या फुलांमुळे बागेत लावले जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची मुळे औषध म्हणून वापरतात. मुळे फक्त झाडाच्या पांढऱ्या प्रकारांपासून घेण्यात यावीत, आणि त्यावरची साल निघालेली नसावी.

या औषधात टर्पेथीन असते. टर्पेथमध्ये जवळपास खऱ्या जलापासारखेच गुणधर्म असतात म्हणून ते खऱ्या जलापाऐवजी वापरण्यास योग्य औषध आहे (खरे जलाप *एक्झोगोनियम पगी* पासून मिळते)




रेखाचित्र क्र. १९ निशोत्तर (ओपेरक्युलीना टरपेथम)

ते रेचक म्हणून वापरण्यात येते. त्यासाठी मुळांची भुकटी घेतात. बाजारात मिळणाऱ्या टर्पेथमध्ये मुळांबरोबर खोडे आणि शाखांचीही भेसळ असते.

# ५५. हार्मल

**पेगॅनम हार्मला**

*कुल :* रूटेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *गंध्य, हर्मल*
बंगाली - *इस्पंद*
गुजराती - *हरमर, इसपन*
मल्याळी, पंजाबी - *हर्मल*
तामिळ - *सिमाईरवंदी*
तेलुगू - *सिमागोरांटी*
(इंग्रजी नाव - *वाईल्ड रूथ)*

या झाडाचे व्यावहारिक नाव स्थानिक नावावरून घेतले आहे.

## वर्णन

३० ते ६० से. मी. उंच क्षुप; पाने ५-८ से. मी. लांब, अनेक अरुंद भागामध्ये विभागलेली; फुले २-३ से. मी. परिघाची, पांढरी, पानांच्या कक्षेत, एकटीच; फळे बोंड प्रकारातील, गोलाकार, ५-८ मि. मी. परिघ असलेली, खोलवर पाळीदार; बिया २.५-४ मि. मी. लांब, तपकिरी, वेगवेगळ्या आकारात, आवरणावर जाळीदार रेशांनी युक्त.

## वितरण

हे झाड उत्तर आणि वायव्य भारतात जवळपास सगळीकडे सांपडते. द्वीपकल्पी भारताच्या शुष्क भागातसुध्दा सापडते.

## औषधी गुणधर्म

हर्मल हे औषध या झाडाच्या वाळवलेल्या बियांपासून मिळते. बियांमध्ये अनेक प्रकारची ॲल्कलॉईड्स असतात आणि ती दम्यात हिस्टीरियात (फेपरे), संधिवातात, पित्ताशयात होणाऱ्या खड्यावर, पोटातल्या मुरड्यावर, ज्वरात उपयोगी आहेत ती काविळीवर, खंडमय आणि कष्टप्रद मासिक धर्मातपण उपयोगी आहेत. हर्मल नशा आणणारे, कृमी नष्ट करणारे आणि वांतीकारक म्हणून देखील वापरले जाते.

'हर्मालिन', 'यागेनिन' आणि 'हर्मिन' हे ॲल्कलॉइड्स हर्मलमधून काढण्यात येतात. ती सर्व सायकोमायमेटिक्स म्हणजे भ्रमनिर्मिती करणारी म्हणून कार्य करतात. ती प्रमस्तिकाच्या संदेशवाहक भागांना आणि मध्यमज्जासंस्था यांना उत्तेजित करतात. मात्र ती जास्त प्रमाणात घेतल्यास विषकारक असतात आणि मज्जासंस्था शिथिल व म्लान करतात. या औषधाच्या जीवाणुनाशक गुणधर्माची सप्रयोग खात्री पटली आहे परंतु मलेरियावर याचा कोणताही उपायकारक परिणाम हे दवाखान्यातील चाचण्यांनी दाखवून दिले आहे.

## इतर उपयोग

हर्मलच्या बियांपासून तांबडा रंग मिळतो. मोहरीच्या तेलात मिसळलेल्या याच्या मुळांची भुकटी केसातील उवांचा नाश करते. घरात हर्मलचे झाड ठेवल्यास डास येत नाहीत.

# ५६. उतरण

**परग्युलारिया डीमिया** (Forsk.) Chiov. syn. **प. अेक्सटेंसा** N.E. Br., डिमिया अेक्सटेंसा R. Br.

*कुल :* ॲस्कलेपियाडेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *उतरण*
हिंदी - *उतर्णी, सदोवनी*
बंगाली - *छागलबटी*
गुजराती - *चमादुधी, नागलदुधी*
पंजाबी - *करियाल*
संस्कृत - *युगंफला*
तामिळ - *उत्तमर्णी*
तेलुगू - *दुष्टुपतिगे*
(मध्य प्रदेश - *घोल ककडी, कडवा डोड*)

वल्लरी औषधी; खोड केसाळ आणि दुधाळ रसांने युक्त; पाने ४-६ से. मी. किंवा काही वेळा जास्त लांब, अंडाकृती किंवा गोल, खालच्या पृष्ठभागावर केसाळ, आरंभस्थान हृदयाकृती; फुले पिंगट किंवा पांढरी, लहान, छोट्या गुच्छांमध्ये; फळे पाठीमागे वाकलेली, जोडी जोडीत, ५-८ से. मी. लांब, १.३ से. मी. रुंद, आवरणावरून उगवलेल्या काट्यांनी आच्छादलेली.

### वितरण

उतरण १००० मीटर उंचीच्या प्रदेशात, भारतात बहुतकरून सर्वत्र सापडते.

### औषधी गुणधर्म

हे संपूर्ण झाड औषधी आहे. उतरणीचा रस (पानांचा) पडशावर व तान्ह्या मुलांच्या अतिसारावर देण्यात येतो. तसेच संधिवातात आणि मासिक धर्म खंडित झाल्यावर देण्यात येणाऱ्या जुलाबाच्या औषधात ते एक घटक आहे. पानांचा रस गर्भाशयासाठी बलवर्धक, कफद्वारक आणि वमनकारक आहे. गर्भाशयाचा बलवर्धक म्हणून उपयोग प्रयोगाद्वारे सिध्द झाला आहे. अतिस्राव आदी स्त्रियांच्या रोगात उपचारासाठी वापरण्यात येतो. उतरणीमधील औषधी तत्त्वे त्यांच्या क्षमतेने 'पिटुइट्रिन' सदृश्य आहेत.

## ५७. कुटकी

**पिक्रोऱ्हयझा कुरोआ** Royle ex Benth

*कुल :* स्क्रॉफ्युलारियेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *कुटकी*
हिंदी - *कुटकी, कुरू*
बंगाली - *कटकी*
गुजराती - *कडू*
काश्मिरी - *करू*
मल्याळी - *कटुक रोहणी*
पंजाबी - *काली -कुटकी*
संस्कृत - *कटुकी*
तामिळ - *कटकु-रोगिणी*
तेलुगू - *कटुक-रोणि*

### वर्णन

कुटकी ५-१० से. मी. लांब पसरट सुरीच्या आकाराच्या पानानीयुक्त छोटी औषधी आहे. या झाडाचे मूलस्तंभ टणक, १५-२५ से. मी. लांब असतात; फुले लहान नळकांडेकृती कणिसात; कणिस पर्णरहित ताठ खोडावर, फुले दोन प्रकारची, काही पूं-केसरातील दांडे ८ मि. मी. लांब, तर इतर दांडे २ से. मी. लांब असतात; फळे १.३ से. मी. लांब.

## वितरण

हे झाड उंच पर्वतामध्ये सुमारे ३००० ते ४००० मीटर उंचीवर हिमालयात काश्मिरपासून ते सिक्कीमपर्यंत सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाचे मूलस्तंभ हेच औषध असतात. हे औषध कडू पौष्टिक औषध आहे. आणि अनियमित म्हणून उपयोगी आहे. ते पाचक रसांचा पित्तस्राव वाढवते. यात जेन्शन सारखेच भूक वाढवण्याचे व पाचक रसांचा स्राव वाढवण्याचे गुणधर्म असल्याचे समजण्यात येते. ते जलोदरातही वापरण्यात येते.

पिक्रोन्हायझाच्या (कुटकी) जीवाणूनाशक गुणधर्मांची पुष्टी त्यावर केलेल्या चाचण्यांत मिळाली आहे.

या औषधाची भारतातील वार्षिक मागणी ४० क्विंटल्स आहे. हिमालयातील उंच पर्वत रांगा ज्या ३००० ते ४००० मीटर उंचीवर आहेत. या झाडाच्या लागवडीस योग्य समजण्यात येतात. हे झाड खऱ्या जेन्शनऐवजी (जेन्शियाना ल्यूटिया) वापरण्यात येऊ शकते म्हणून महत्त्वाचे आहे.

# ५८. पाइन

*(चिल, देवदार)*

**पायनस रॉक्सबर्गीई** Sargent syn. पा. लाँगिफोलिया Roxb.

*कुल :* पायनेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *चीड*
आसामीं - *तेल्लिया*
बंगाली - *सरल गाछ*
पंजाबी - *चील*
तामिळ - *सिमईदेवादारी*

रॉक्सबर्गी हे जातीनाम सुप्रसिध्द वनस्पती शास्त्रज्ञ रॉक्सबर्ग यांच्या सन्मानार्थ देण्यात आले आहे. ते भारतीय वनस्पतीशास्त्राचे जनक म्हणून ओळखले जातात.

## वर्णन

पाइन हा मोठा सूचिपर्णी वृक्ष आहे; पाने २५-३० से. मी. लांब, तीनच्या समूहात; नर शंकू लहान, स्त्री शंकू १०-२० से. मी.

## वितरण

भारतात हे झाड हिमालयात खालच्या भागात आणि इतर पहाडांवर मिळते; ते शोभेचे झाड म्हणून नेहमी बागांमध्ये लावले जाते.

## औषधी गुणधर्म

पायनस् या प्रजातीच्या अन्य जातींपासून व *पायनस् रॉक्सबर्गीई* पासून *टर्पेनटाइन* (ओलिओरेझिन) मिळते. याच्या शुध्दिकरणाने टरपेनटाइनचे तेल मिळते. त्याचा औषध म्हणून उपयोग होतो.

या तेलाचा कातडीवर उत्तेजक परिणाम होतो व जवळपास या औषधाच्या सर्वच उपयोगात हे गुणधर्म गृहीत धरलेले आहेत. कमी आणि नियंत्रित प्रमाणात हे उत्तेजक, कफद्वारक म्हणून काम करते. जुन्या खोकल्यात, व श्वासनलिकांच्या सूजेवर उपयोगी आहे. ते पोटाचा फुगारा व मुरडा कमी करते. टायफॉईड (मुदतीचा ताप), हिरड्यातल्या व नाकातल्या कमी प्रमाणात होणाऱ्या रक्तस्रावासाठी याचा मर्यादित उपयोगसुध्दा आहे. या तेलाच्या एनिमामुळे बध्दकोष्ठता दूर होते. याचा अगदी सर्वसाधारण उपयोग संधिवाताच्या दुखण्यावर चोळण्याचे औषध म्हणून होतो. टर्पेन्टाइनच्या वाफा हुंगल्यास श्वासनलिकांच्या सुजेत फरक पडतो.

## इतर उपयोग

या झाडाचे लाकूड अनेक प्रकारे मोठ्या प्रमाणावर वापरले जाते. उदा. बांधकामात, लाकडी सामान बनविण्यात चहाच्या खोक्यासाठी, आगपेट्यांच्या कारखान्यात, खेळांच्या साहित्यात व संगीताच्या साहित्यासाठी.

त्याची बिरोजा नावाची राळ बांगड्यासाठी वापरली जाते. सालीत 'टॅनिन्स' आणि रंगद्रव्ये असतात.

# ५९. लाँग पेपर

*(पिपली)*

**पायपर लाँगम** L.

*कुल :* पायपेरेसाई

*भारतीय नावे :* हिंदी - *पिपला, पिपली*
आसामी - *पिपलू*
बंगाली - *जात्या, पिपल*
गुजराती - *पिपली*
संस्कृत, मागधी - *पिप्पली*
तामिळ, तेलुगू - *पिपिली*
(जलपौगुडी - *शावप्पा)*

लाँग पेपर हे व्यावहारिक नाव या झाडाच्या इंग्रजीतल्या सर्वसाधारण नावावर आधारित आहे. याचे कणिस लांब असते यामुळेच याला लाँग पायपर म्हणतात. यावरूनच हे *पायपर नीग्रम* या दुसऱ्या जातीपासून ओळखले जाते. *पायपर नीग्रमची* फळे गोल असतात.

काही जुन्या लिखाणात लाँग पायपर 'मगधी' नावाने संबोधिलेले आहे. यावरून हे झाड मगध भागातील म्हणजे उत्तर बिहारमधील आहे असे दिसते.

## वर्णन

सुगंधित, जमिनीवर रांगणारे लहान झाड, बऱ्याचदा वल्लरीसारखे दिसते; खालची पाने ६-१० से. मी. लांब, रुंदपणे अंडाकृती, आरंभस्थानी खोलपणे हृदयाकृती व पाळी मोठी; वरची पाने लांबट अंडाकृती, वरच्या पृष्ठभागावर पूर्ण गर्द हिरवे आणि चमकदार, खालच्या पृष्ठभागावर फिकट, अनुपर्णे ठळक, १.३ से. मी. लांब, परंतु लगेच गळून पडणारी; फुलांचे कणिस एकेक, पुंपुष्पाच्या कणिसाचे सहपत्र अरुंद, स्त्रीपुष्पाचे गोल; फळ लहान, अंडाकृती, मांसल कणिसात बुडालेले, २.५ - ४ से. मी., अंडाकृती-लांबट, काळपट हिरवे, चमकदार.

## वितरण

हे झाड भारताच्या उष्ण भागात उगवते आणि मुद्दाम लावलेही जाते.

## औषधी गुणधर्म

लाँग पेपर म्हणजेच या झाडाची वाळवलेली फळे असतात. ती शक्तीवर्धक

म्हणून व उत्तेजक तपकिरी तयार करण्यासाठी वापरली जातात. संधिवाताच्या दुखण्यावर आणि अर्धांगवायूवर चोळण्यासाठी औषधात वापरली जातात. श्वासनलिका सुजण्याच्या जुन्या रोगात या झाडाच्या कच्च्या, वाळवलेल्या फळांचा काढा देण्यात येतो. पक्व फळे पचनास मदत करणारीं, वातबध्दतेचा त्रास दूर करणारी व सुगंधी आहेत.

पानांचा आणि फळांचा जीवाणूनाशक गुणधर्म सप्रयोग सिध्द करण्यात आला आहे.

२ लाख रुपये किंमतीचे लाँग पायपर १९७७-७८ साली निर्यात करण्यात आले.

## इतर जाती

*पायपर नीग्रम* L. किंवा ब्लॅक पेपर (बंगाली, हिंदी - *गोल मिरच, कालि मिरच, दखनी मिरच;* संस्कृत - *कफविरोधी*, मराठी - *काळे मिरे, मिरे*) ही पायपर या प्रजातीची दुसरी जाती आहे. बहुतेक भाषांमधील नावामध्ये फळांच्या आकारावरून 'गोल' आणि रंगावरून 'काली' असा उल्लेख येतो. संस्कृत नावावरून या फळाच्या वापराविषयीचा बोध होतो.

काळे मिरे ही एक मजबूत मोठी, काष्ठमय खोड, फांद्या व रुंद अंडाकृती गोल पाने असलेली वल्लरी आहे; फुले लांब कणिसात येतात; फळे लहान गोलाकार ६-७ मि. मी. परिघाची, पिवळी पक्व झाल्यावर लाल होणारी. काळे पेपर म्हणजे काळे मिरे हे औषध वाळवलेल्या कच्च्या फळांपासून मिळते. ते उत्तेजक, कोष्ठवायू कमी करणारे व पचनास मदत करणारे आहे. ते जास्त प्रमाणात घेतल्यास अंग उष्ण होते व घाम येतो. हे मूत्रवर्धक व मूत्रविरेचक असते पण यामुळे मूत्राशयात जळजळ होते. बियांवर केलेल्या काही प्रयोगांनी त्यांच्यात जीवाणूनाशक गुणधर्म असल्याचे दिसून आले आहे.

स्वयंपाकात वापरण्यात येणाऱ्या अनेक वस्तूंत काळ्या मिऱ्यांचा मसाला वापरण्यात येतो. हा मसाला वातकोष्ठतेत फायदा देणारा म्हणून वापरण्यात येतो.

५०० लाख रुपयाचे काळे मिरे १९७७-७८ साली निर्यात करण्यात आले.

*पायपर क्युबेबा* L. f. *(क्युबेब, शीतल चिनी, सुगंध मरिच, कबाब चिनी)* हे आग्नेय आशियातील झाड आहे. त्याच्या फळांपासून काढलेले तेल मूत्रउत्सर्जन संस्थेच्या रोगावर उपयोगी आहे. भारताची या औषधाची वार्षिक मागणी ४० क्विंटल्स आहे. पूर्व व दक्षिण भारतातील प्रदेश याच्या लागवडीस योग्य समजण्यात येतात.

# ६०. इसबगोल

**प्लँटॅगो ओव्हेटा** Forsk

*कुल :* प्लँटॅजिनेसीई

*भारतीय नावे :* या झाडाच्या अनेक भागातील व भाषांमधील स्थानिक नावात

इसबगोल या संस्कृत नावाचाच किंचित अपभ्रंश दिसतो. व्यावहारिक नाव देखील याच नावावरून आले आहे.

## वर्णन

बहुतकरून खोडविरहित, लहान औषधी, दाट आणि मऊ केसाळ वाढीने आच्छादलेली; पाने ८-२५ से. मी. लांब, फारच अरुंद; फुले लहान अंडाकृती किंवा नळकांड्याच्या आकाराच्या कणिसात, १.५-४ से. मी. लांब; फळ ८ मि. मी. लांब, वरचा अर्धा भाग झाकणासारखा उघडतो. बिया बोटीच्या आकाराच्या.

## वितरण

इसबगोल नैसर्गिक अवस्थेत वायव्य भारतात मर्यादित भागात सापडते परंतु इतर ठिकाणी मोठ्या प्रमाणावर लावले जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या बिया (या प्रजातीच्या इतर जातींप्रमाणेच) औषधी आहेत. बियांचे उपयोगी गुणधर्म मुख्यतः त्यात मोठ्या प्रमाणावर असलेल्या श्लेष्मकामुळे आणि भ्रूणपोषी तत्त्वांमुळे असतात.

इसबगोल अनेक प्रकारच्या जुन्या आमांशात, जीवाणूंमुळे व हगवणीत फार उपयोगी आहे. त्यातील श्लेष्मक त्वचेच्या जखमा कमी करणारे आहे.

तसेच बध्दकोष्ठतेतही उपयोगी आहे. बिया वापरण्याआधी पाण्यात भिजवल्यास त्या अन्ननलिकेत लवकर शोषल्या जातात. कोरड्या संपूर्ण बिया पोटात आग पडल्यासारखा त्रास निर्माण करतात, अन्ननलिकेत तांत्रिक अडसर निर्माण करतात. बियामधील मोठ्या प्रमाणातील श्लेष्मक मळ एकत्र करते व यामुळे मळाचे प्रमाण वाढते आणि ते विनासायास बाहेर निघण्यास मदत करते. इसबगोलचे टरफल (हिंदी - *इशबगुल कि भुसि*) हे इसबगोलच्या बियावरील कोरडे आवरण आहे, ते बियांना कांडून पाखडून बाजूला काढले जाते. टरफलाचे गुणधर्म बियांसारखेच आहेत. परंतु बियापेक्षा जास्त गुणकारी असते. यामुळे अन्ननलिकेतला अडसर निर्माण होतो आणि आग पडते. टरफल घेतांना त्यांना भिजवण्याचीपण गरज नाही व पूर्ण बिया घेण्यापेक्षा ते वापरण्यास सोपे आहे. बियाच्या भ्रूणापासून काढलेल्या तेलात ५०% लिनोलिक आम्ल असते ते धमन्यांचा कठिणपणा घालवण्यास मदत करते. ते सूर्यफुलाच्या तेलापेक्षाही अधिक परिणामकारक आहे आणि सशांच्या शरीरातील कोलेस्टरॉलचे प्रमाण कमी करते असे दिसून आले आहे.

भारतात प्रतिवर्षी १८० लाख रुपयांचे टरफल व बियांची निर्यात होते.

# ६१. पडवेळ

*(भारतीय पोडोफिलम्)*

**पोडोफिलम् हेक्झँड्रम** Royle syn. **पो. एमेडि** Wallich ex Hook. f. & Th.

*कुल :* **बरबेरिडेसीई**

*भारतीय नावे :* मराठी - *पडवेळ*
हिंदी - *बन बैंगन, पापरी*
गुजराती - *वेनी वेल*
काश्मिरी - *बान वांगन*
पंजाबी - *बनककडी, गलककडी*

या झाडाच्या पोडोफिलम या शास्त्रीय नावावरून व्यावहारिक नाव घेण्यात आले आहे.

## वर्णन

सरळ-ताठ, रसदार वनस्पती; जमिनीत पसरत जाणारे मूलस्तंभ; फुलांच्या फांद्या टोकास, पाने असलेल्या व सरळ ताठ; पाने दोन, १५-२५ से. मी. परिघाची, खोलवर ३-५ पाळ्यांत विभागलेली, दातेरी, जांभळे ठिपके असलेली; फुले २.५ ते ५ से. मी. परिघाची, पांढरी किंवा गुलाबी, कपाच्या आकाराची, बहुधा एक एक; फळ अंडाकृती, २.५ - ५ से. मी. शेंदरी.

## वितरण

**हिमालयाच्या उंच,** आतील पर्वत रांगांमध्ये सामान्यतः ३००० ते ४००० मीटर उंचीवर **हे झाड सापडते. काश्मिरमध्ये** ते १८०० मीटर उंचीवर सापडते.

## औषधी गुणधर्म

झाडाची वाळवलेली मूलस्तंभे औषध म्हणून वापरतात. मूलस्तंभामध्ये 'पोडोफायलिन' नावाचे रेझिन असते. ते रेचक असते त्याचा प्रभाव हळूहळू पण तीव्र असतो. आणि जास्त प्रमाणात घेतल्यास पोटात तीव्र आग आग होते व मुरडा येतो. पोडोफिलम औषध बहुधा बेलाडोना किंवा कोरफडीबरोबर मिश्रण करून देण्यात येते.

पोडोफिलम् अनेक त्वचारोगात आणि गाठींच्या वाढीत उपयोगी असल्याचे सांगण्यात येते. कर्क रोगातील ऊतीं बऱ्या करण्यासाठी वापर करण्याबाबतचे संशोधन चालू आहे.

या औषधाची भारतातील वार्षिक मागणी ४० क्विंटल्स आहे.

*पोडोफिलम पेल्टॅटम* L. ही पोडोफिलम या प्रजातीची अमेरिकन जाती काही वेळा लावली जाते. काश्मिर, हिमाचल प्रदेश, पंजाब, उत्तर प्रदेश आणि सिक्कीमचे हिमालयातील १५०० ते ३००० मीटर उंचीवरचे पर्वतमय भाग या जातीच्या लागवडीसाठी योग्य असल्याचे समजण्यात येते.

# ६२. बाबची (बावची)

**सोरेलिया कॉरिलिफोलिया** L.

*कुल* : पॅपिलिओनेसीई

*भारतीय नावे* : मराठी, पंजाबी - *बाबची, बावची*
हिंदी - *बाबची*
बंगाली - *लटकस्तूरी*
गुजराती - *बावची*
संस्कृत - *सुगंध कंटक*
तामिळ - *कार्पोकृषी*
तेलुगू - *काला-गिजा*
उर्दू - *बकुची*

यास काही ठिकाणी सोरेलिया या व्यावहारिक नावाने देखील ओळखले जाते. बावची अथवा बाबची हे दुसरे व्यावहारिक नाव स्थानिक भारतीय नावावरून घेतले आहे.

## वर्णन

ही सरळ-ताठ वाढणारी औषधी आहे. फांद्या ग्रंथींच्या ठिपक्यांनी आच्छादलेल्या असतात; पाने गोल, दोन्ही पृष्ठभागांवर ग्रंथीचे ठिपके असलेली; फुले लहान, निळसर, जांभळी, १०-३० एका गुच्छात, पानाच्या अक्षकोनातून निघणारी; फळे काळी, गोलाकार किंवा लांबट, पुष्कळ व्रण असलेली. बी एक गुळगुळीत.

## वितरण

मोकळ्या, ओसाड जागेवर हे झाड तण म्हणून भारतभर सापडते. काही जागी ते लावलेही जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या बियाच औषधी आहेत. बियांमध्ये बाष्पशील सुगंधी तेल आहे. ते त्वचारोगाच्या ठराविक जीवाणूंवर फार परिणामकारक आहे म्हणून बाबचीच्या बिया

कोड आणि महारोगात बाहेरून मलमाच्या स्वरूपात लावण्यात आणि मुखाद्वारे घेण्यास उपयोगी आहेत. बिया मूत्रउत्सर्जक आणि कृमिनाशक म्हणूनही उपयोगी आहेत. बियांचे कृमिनाशक आणि जीवाणूंनाशक गुणधर्म प्रयोगांनी सिध्द झालेले आहेत.

बियापासून काढलेले ओलिओरेझिनस अर्क गुप्त रोगात उगम नसलेल्या पांढऱ्या कोडावर बाहेरून लावण्यासाठी उपयोगी आहे.

या औषधाच्या महारोगातील उपयोगामुळे त्यास देशी औषधपध्दतीत कुष्ठनाशिनी म्हटले आहे.

बाबचीची मुळे दातांच्या किडण्यावर आणि पाने अतिसारावर उपयोगी आहेत असे म्हटले जाते.

# ६३. होनी

**टेरोकार्पस मार्सुपियम्** Roxb.

*कुल* : पॅपिलिओनेसी

*भारतीय नावे* : मराठी - *होनी*
हिंदी - *पिआसल, बिजासाल*
गुजराती - *बिबला*
कानडी - *होन्ने*
मल्याळी - *किनो*
संस्कृत - *महाकुटज*

या झाडाच्या सालीत किनो नावाचा डिंक असतो यावरून यास भारतीय किनो म्हणून देखील संबोधतात.

## वर्णन

सुंदर, विशाल वृक्ष; पाने संयुक्त, ५७ पर्णिकांसह; पर्णिका ८-१३ से. मी. लांब, लांबट किंवा भिंगाकृती; फुले सुमारे १.५ से. मी. लांब, पिवळी, सुवासिक फार लांब, दाट गुच्छांमध्ये; फळ २-५ से. मी. लांब, वर्तुळाकार, एक बीजी.

## वितरण

हा वृक्ष सामान्यपणे मध्य भारतात आणि द्वीपकल्पी भारतात मुख्यतः मिश्रित पानझडी जंगलात सापडतो. तो गुजरातेत, मध्यप्रदेशात आणि हिमालयाच्या खालच्या भागात ११०० मीटर उंचीवर दिसतो. हे झाड फुलल्यावर फारच अप्रतिम दिसते.

## औषधी गुणधर्म

या वृक्षाची पाने, फुले आणि डिंक औषधी आहेत. सालीच्या चिरांमधून डिंक बाहेर पडतो त्यालाच किनो डिंक म्हणतात. हा तुरट असतो आणि अतिसारात उपयोगी असतो. त्याचे गुणधर्म काथपेक्षा सौम्य असतात. तो दातांच्या दुखण्यातही वापरला जातो. डिंक ज्वरात आणि मूत्रोत्सर्जानात उपयोगी समजण्यात येतो. चुरगळलेली पाने गळूवर आणि इतर त्वचारोगावर लावली जातात.

हा वृक्ष मधुमेहात उपयोगी असल्याचे सर्वज्ञात आहे. या वृक्षाचा लाकडाचा ओंडका रात्रभर पाण्यात भिजवून ते पाणी मधुमेहाच्या रुग्णास दिले असता उपयोगी असल्याचे सांगण्यात येते. मात्र या सर्व उपचारांना कुठलाही प्रायोगिक आधार नाही. रुग्णविषयक प्रयोगांमध्ये मधुमेहाच्या फक्त ७ टक्के रोग्यांनी या औषधास प्रतिसाद दिला.

## इतर उपयोग

उच्च प्रतीच्या लाकडी सामानासाठी या झाडाचे लाकूड मौल्यवान समजले जाते तसेच ते बांधकाम वगैरेतही महत्त्वाचे असते.

## इतर जाती

*टेरोकार्पस् सॅन्टॅलिनस्* L. f. या नावाची या प्रजातीची जाती (इंग्रजी - रेड *सँडर्सवुड*, हिंदी - *लालचंदन*, संस्कृत - *रक्तचंदन*) सुध्दा औषधी आहे. या झाडाच्या लाकडाचा गाभा थंड असतो म्हणून तो उगाळून डोकेदुखी व सुजण्यावर बाहेरून लावण्यात येतो. हे झाड लाकडासाठी महत्त्वाचे मानले जाते. ते दक्षिण भारतात सापडते.

# ६४. सर्पगंधा

**राउवोल्फिया सेर्पेंटिना** (L.) Bentham ex Kurz.

*कुल :* ॲपोसिनेसिई

*भारतीय नावे :* मराठी - *सर्पगंधा, करकया*
हिंदी - *छोटा चांद*
बंगाली - *चंद्र*
मल्याळी - *चुवन्नाअवलपोरी*
संस्कृत - *चंद्रिका, सर्पगंधा*
तामिळ - *चुवन्नाअवलपोरी*
तेलुगू - *पातालगंधि*
उर्दू - *धान बरूवा*
(सहारनपूर - *मूंगा*)

भारतात बऱ्याच ठिकाणी या झाडास सर्पगंधा या नावाने ओळखले जाते. काही ठिकाणी शास्त्रीय नावावरून राउवोल्फिया या नावानेपण ओळखतात. हे शास्त्रीय नाव जर्मन वनस्पती तज्ञ आणि वैद्य लिओनार्ड राउवोल्फ यांच्या नावावरून देण्यात आले आहे.

## वर्णन

३०-७५ से. मी. उंच, ताठ-सरळ, गुळगुळीत क्षुप; पाने मंडलाकार, ८-२० से. मी. लांब, निमुळते होत पर्णवृंतात संमीलित होणारी; फुले सुमारे १.५ से. मी. लांब; दले पांढरी किंवा फिकट गुलाबी, पुष्पबंधाक्ष गर्द लाल, लहान गुच्छांमध्ये; फळे लहान, गोल, पक्व झाल्यावर गर्द जांभळी किंवा काळपट.

## वितरण

१०० मीटर उंचीवर हे झाड भारतात सर्वत्र सापडते. हिमालयाच्या पायथ्याशी, पूर्व आणि पश्चिम घाटाच्या कमी उंचीच्या पर्वत रांगांमध्ये हे झाड सर्वसामान्यपणे सापडते. ते बंगाल, बिहार, उत्तर प्रदेश आणि महाराष्ट्राच्या अनेक मैदानी सपाट जागेवरूनही गोळा करण्यात आलेले आहे. सध्या हे झाड अनेक जागी लावण्यात येते.

## औषधी गुणधर्म

सालीसह वाळवलेली मुळे या झाडापासून मिळणारे औषध आहे, मात्र ती शक्यतो ३ ते ४ वर्षांच्या झाडापासून हिवाळ्यात जमा करण्यात आलेली असावीत.

राउवोल्फिया, भारतीय औषधात ४००० वर्षापूर्वीपासून माहीत होते असे समजण्यात येते. चरकाच्या ग्रंथात याचा उल्लेख आढळतो. या झाडाच्या मुळांत अनेक ॲल्कलॉइड्स असतात. या औषधाचा मुख्य उपयोग उपशामक म्हणून निद्रेसाठी आणि रक्तदाब कमी करण्यासाठी होतो. सध्या या औषधाचा उपयोग मनोविकारात आणि उच्च रक्तदाबात मोठ्या प्रमाणावर होतो. उपशामकतेस या औषधाने वेळ लागतो म्हणून तीव्र त्रास असलेल्या रुग्णांसाठी हे फारसे उपयोगी नाही. प्राथमिक व सौम्य अवस्थेत असलेल्या रुग्णांसाठी किंवा जुन्या मानसिक विकारावर ते अतिशय योग्य औषध आहे. या औषधात मन शांत स्थिर ठेवण्याचा गुणधर्म आहे. श्वासनलिका सुजलेल्या, दम्याच्या व जठरात क्षत असलेल्या रुग्णांना हे औषध देण्यात येऊ नये.

या झाडाची मुळे उदराच्या रोगावर आणि ज्वरात सुध्दा उपयोगी आहेत. सर्पगंधा (राउवोल्फिया) या प्रजातीच्या इतर जातीही (उदा. *रा. टेट्राफिला* L. syn. *रा. कॅनसेनस* L) औषधी म्हणून उपयोगी आहेत.

या झाडाच्या समूहावर बरेच संशोधन करण्यात आलेले आहे आणि सध्याही होत आहे. या बाबतीत भारताची प्रगती अभिमानास्पद आहे तरीही काही देश राउवोल्फियाचा परिणाम असलेली कृत्रिम उत्पादने निर्माण करण्यात गुंतलेले आहेत.

सर्पगंधाची भारताची वार्षिक गरज १२०० क्विंटल्स आहे आणि त्याची लागवड मोठ्या प्रमाणावर होणे आवश्यक आहे. हे झाड मैदानी प्रदेशात जवळपास सगळीकडे आणि उपहिमालयाच्या सदाहरित अरण्यांत लावले जाऊ शकते.

या झाडाचे मुळांच्या तुकड्यांपासून उत्कृष्ट असे शाकीय प्रजनन होऊ शकते. नवी झाडे बी आणि खोडांच्या तुकड्यांपासूनही निर्माण केली जातात. एका एकरात ६-७ क्विंटल्स औषध जमा करण्यात यश आले आहे. याहीपेक्षा जास्त उत्पादन दोन वर्षांच्या शेतीपासून फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिट्यूट, डेहराडूनने करून दाखवले आहे.

या औषधाची निर्यात मर्यादित करण्यात आली आहे आणि १९७७-७८ साली ४०,००० रुपयांचे राउवोल्फिया निर्यात करण्यात आले आहे.

# ६५. ऱ्हुबार्ब

**ऱ्हीअम् एमेडि** Wallich ex. Meissn

*कुल :* पॉलीगोनेसीई

*भारतीय नावे* : हिंदी - *रेवंदचीनी*
बंगाली - *कोकिमा, रेवंदचीनी*
गुजराती - *गमनी रेवंदचीनी*
संस्कृत - *रेवट चीनी*
तामिळ तेलुगू - *नत्तूईरेवलचीनी*

## वर्णन

मजबूत खोड व मुळे असलेली उंच औषधी; खालची पाने फार मोठी, सुमारे ६० से. मी. परिघ असलेली, गोल, ३०-४५ से. मी. मजबूत पर्णवृंत्तावर; फुले लहान, गर्द जांभळी, फार मोठ्या गुच्छांमध्ये; फळ १.३ से. मी. लांब, जांभळे.

## वितरण

ऱ्हुबार्ब हिमालयात काश्मिरमध्ये, हिमाचल प्रदेशात, पंजाबमध्ये उत्तर प्रदेशात आणि नेपाळमध्ये ३००० ते ४००० मीटर उंचीवर सापडते.

## औषधी गुणधर्म

*ऱ्हीअम एमेडिची* वाळवलेली मूलस्तंभे औषध आहेत. *ऱ्हीअम* बेबियानम् या जातीची मूलस्तंभेही वापरण्यात येतात. फुले येण्याच्या आत ६-७ वर्षाच्या झाडापासून मूलस्तंभ जमा करण्यात यावेत त्यांची साल अशावेळी निघणार नाही याची काळजी घ्यावी.

*ऱ्हुबार्ब* रेचक म्हणून वापरण्यात येते. या औषधात टॅनिन्स असल्याने जुलाब झाल्यावर पोटातील जुलाब संकुचित झाल्यासारख्या वाटतात. यामुळे बध्दकोष्ठता वाढते. ऱ्हुबार्ब जुन्या बध्दकोष्ठतेच्या रुग्णांसाठी उपयोगाचे नाही. परंतु सौम्य बध्दकोष्ठता असणाऱ्यांनी वापरण्यास हरकत नाही. यात असलेल्या कातडी संकुचित करण्याच्या गुणधर्मामुळे काही हगवणीच्या प्रकारातही देण्यात येते. उदा. आग निर्माण करणारे पदार्थ पोटात गेल्यावर होणारा अतिसार.

या औषधाची भारताची वार्षिक गरज ४० क्विंटल्स आहे. हिमालयातील उंच प्रदेश याच्या लागवडीसाठी योग्य आहेत.

## इतर जाती

ब्रिटिश औषध कोशात *ऱ्हीअम पामेटम्* L. पासून मिळणारे औषध योग्य समजण्यात आले आहे. परंतु त्याऐवजी भारतीय झाडे वापरण्यास योग्य आहेत.

# ६६. **एरंड** (एरंडी)

**रिसिनस कॉम्यूनिस** L.

*कुल :* युफोर्बिअेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *एरंडी*
हिंदी - *आरंडी*
आसामी, बंगाली - *भेरेंडा*
गुजराती - *दिवेली*
मल्याळी - *आवणक्क*
उडिया - *जडा*
संस्कृत - *एरंड*
तामिळ - *आमनक्कम*
तेलुगू - *एरंडमु*
(किस्तना [आंध्र] - *आमदम, पेड्डा आमदम*)

काही वेळा या जातीच्या वेगवेगळ्या प्रकारांना विविध स्थानिक नावे आहेत. उदा. भट रेडी - या झाडाचे बी पांढरे असते, जोगिया रेडी या झाडाचे बी पिंगट रंगाचे असते.

जुन्या लिखाणात या झाडास चित्रविजा पंचागुल आणि वातारी ही नावे आढळतात. ही नावे झाडाच्या आकारावरून किंवा गुणधर्मांवरून देण्यात आलेली आहेत. चित्रविजा याच्या सुंदर बियांवरून देण्यात आले आहे; आणि पंचांगुल पानावर असलेल्या पाच शिरांवरून आणि पंज्यासारख्या पानाच्या आकारावरून आले आहे. हे वातावर खूपच गुणकारी असल्याने वातारी नावाने ओळखले जाते. याचे व्यावहारिक नाव कॅस्टर हे सामान्य इंग्रजी नावावरून आले आहे.

## वर्णन

ते उंच क्षुप आहे, काहीवेळा वृक्षासारखे होते; पाने फार मोठी व रुंद, कडा गोलाकार, परंतु पर्णकर्तनाने ७ भागात (काही वेळा ९ भागात) विभागलेली, कडा दातेरी; फुले मोठी अग्रास असलेल्या गुच्छांमध्ये; फळ काटेरी बोंड, सहा भागात विभागलेले; बिया लांबट, त्यावरील आवरण कडक, या झाडाचा एक प्रकार बहुवर्षीय व काष्ठमय खोड असलेला असतो, बिया मोठ्या लाल असतात. या बियांपासून काढलेले तेल दिव्यांसाठी व वंगण म्हणून यंत्रामध्ये वापरतात. दुसरा प्रकार वार्षिक पीक म्हणून वाढवण्यात येतो आणि करड्या-तपकिरी रंगाच्या बियांनी युक्त असतो. या

बियांपासून काढलेले तेल औषधी म्हणून वापरतात. या व्यतिरिक्त तांबडी-पिवळसर पाने असलेला प्रकार शोभेसाठी लावण्यात येतो.

## वितरण

हे झाड शेतांच्या, बागेच्या इत्यादीच्या बांधावर लावले जाते आणि शेतात, बागेत, वस्त्यांजवळ आणि ओसाड जागेवर नैसर्गिक अवस्थेत वाढते.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या बिया औषधात वापरल्या जातात. बिया विषारी आहेत. याच्या २ किंवा ३ बियांनी जीवितास धोका संभवतो. या बियांपासून काढलेले तेल (कॅस्टर ऑइल) रेचक म्हणून वापरले जाते. यास दुधाबरोबर किंवा फळांच्या रसाबरोबर देणे चांगले असते. एरंडाचे तेल दुःखनाशक मलमांमध्ये आणि डोळ्यात टाकायच्या पातळ औषधातसुध्दा वापरले जाते.

सुखरूप बाळंतपणासाठी एरंडाच्या तेलाचा वापर संशयास्पद आहे. खरे म्हणजे गर्भ व मासिक पाळीत रेचक म्हणूनसुध्दा क्वचित देण्यात यावे. गर्भधारणाविरोधी (प्रतिबंधक) मुरंबे आणि मलम बनवण्यासाठी एरंडाचे तेल वापरले जाते. बस्तरचे आदिवासी सांधेदुखीवर याचा पाला चोळतात, कोवळी पाने कुटून रेचक म्हणूनही वापरतात. एरंडाच्या तेलापासून तयार केलेला चिकट पदार्थ (जेल) त्वचारोगांवर व धंद्यात उद्‌भवणाऱ्या इसबवर व त्वचारोगांवर उपयोगी आहे.

# ६७. चंदन

**सॅन्टॅलम अलबम** L.

*कुल* : सँटॅलसीई

*भारतीय नावे* : मराठी, संस्कृत - *चंदन*
हिंदी - *चंदन, संदल*
बंगाली, गुजराती - *सुखड*
तामिळ, तेलुगू - *चंदन, संदल*

या झाडाचे व्यावहारिक नाव त्याच्या भारतीय नावावरून आले आहे.

## वर्णन

मध्यम आकाराचा, सदाहरित वृक्ष; फांद्या बहुतेक खाली लटकलेल्या; साल काळी, खडबडीत आणि त्यात सरळ चिरा असलेली; पूर्ण वाढलेले लाकूड सुगंधी; पाने

४-७ से. मी. लांब, संमुख, वरच्या पृष्ठभागावर चमकदार; फुले लहान, फिकी जांभळी, लहान गुच्छांत; फळे गोलाकार, ६ मि. मी. परिघ असलेली, जांभळी, काळी व रसदार.

## वितरण

हा वृक्ष भारताच्या द्वीपकल्पी प्रदेशात विशेषतः दक्षिण भारतात नैसर्गिक अवस्थेत उगवतो.

## औषधी गुणधर्म

या झाडाच्या लाकडापासून (गाभ्यातून) काढलेले तेल औषधी आहे. हे तेल लघवी होण्याच्या, मूत्राशय सुजण्याच्या, परमा आणि कफ होण्याच्या उपचारात वापरले जाते.

लाकूड पाण्याबरोबर उगाळून लेप तयार करतात. तो सुजेवर, तापात कपाळावर आणि त्वचारोगावर लावला जातो. बियांपासून काढलेले तेल त्वचारोगावर वापरले जाते.

## इतर उपयोग

लाकूड लहान घरगुती वस्तू बनवण्यासाठी मोठ्या प्रमाणावर वापरले जाते. त्याचा सुवास बऱ्याच काळापर्यंत टिकून राहतो. लाकडाची भुकटी अगरबत्ती तयार करण्यासाठी वापरण्यात येते आणि सुगंधी भुकटी म्हणून देखील वापरली जाते. तेल, साबणे, ऊटी इत्यादींमध्ये स्नानाच्या सामानात सुगंधी म्हणून मोठ्या प्रमाणावर वापरले जाते आणि कीटकनाशक म्हणूनही वापरतात.

१७ लाखाचे चंदनाचे लाकूड व ७ लाखाचे तुकडे व भुकटी १९७६-७७ साली निर्यात करण्यात आली.

# ६८. अशोक

**साराका असोका** (Roxb.) DeWilde. syn. **सा. इंडिका** auct non L.

*कुल :* सिझॅलपिनेसिई

*भारतीय नावे :* हिंदी, बंगाली - *अशोक*
मल्याळी, मराठी, उडिया - *अशोक*
तामिळ - *असोगम*

व्यावहारिक नाव अशोक स्थानिक भारतीय नावावरून घेण्यात आले आहे. त्याचा उगम पुराणातील अशोक वाटिका; सीतेला ठेवण्यात आलेल्यावरून घेण्यात आले आहे.

## वर्णन

सदाहरित, लहान वृक्ष, शाखांवर पाने भरपूर संख्येत, दाट; पर्णिका ७-२५ से. मी. लांब, कातडी पोताची; फुले रंगीत सहपत्रामुळे चमकदार नारंगी, लहान दाट गुच्छांमध्ये; फुळे १५-२५ से. मी. लांब, सपाट; बिया अनेक

## वितरण

हा वृक्ष मध्य आणि पूर्व हिमालयात, पूर्व व दक्षिण भारतात सापडतो; तो त्याच्या सुंदर फुलांसाठी लावला जातो.

## औषधी गुणधर्म

या वृक्षाची वाळवलेली साल औषधोपयोगी आहे. मासिक पाळीच्या जास्त रक्तस्रावात ते गर्भाशयाचे संकुचक व उपशम करणारे म्हणून वापरण्यात येते. ते गर्भाशयाच्या रक्तस्रावात अरगॉट ऐवजी वापरण्यात येते.

या वृक्षाच्या सालीपासून अनेक औषधी तत्त्वे काढून त्यांच्या गर्भाशयातील रोगावरच्या उपयोगासंबंधी चाचण्या घेण्यात आल्या, परंतु त्या निरुपयोगी ठरल्या. तथापि या औषधाचा वापर काही अनोळखी घटकामुळे किंवा अनेक घटकांच्या एकत्र परिणामामुळे असण्याची शक्यता आहे.

फुले कुटून पाण्यात मिसळून अतिसारात रक्त पडण्यावर दिल्यास परिणामकारक ठरतात. बिया मूत्रउत्सर्जनाद्वारे बाहेर पडणाऱ्या पदार्थांच्या उपचारात उपयोगी असल्याचे सांगण्यात येते.

# ६९. कूथ

**सॉस्यूरिया लॅपा** Clarke

*कुल :* ॲस्टरेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *कूथ*

बंगाली - *कुर*

गुजराती - *कूथ*

मल्याळी - *कोट्टम*

संस्कृत - *अगद, कुष्ट*

तामिळ, तेलुगू - *कोष्टम*

या झाडाचे व्यावहारिक नाव हिंदी नावावरून घेतले आहे.

## वर्णन

२ मीटर उंच बहुवर्षीय औषधी; पाने फार मोठी; खालची जमिनीजवळची १.२ मीटर लांब, पंख असलेल्या पर्णवृंत्तावर; वरची पाने लहान, काहीवेळा पर्णवृंत्तावर; पानाच्या पायाजवळील २ पाळी खोडांना पकडणारी; फुले सुमारे २ से. मी. लांब, निळसर जांभळी किंवा जवळ जवळ काळी, गोल मुंडकात; काही मुंडके खोडाच्या टोकाकडे एकत्र झालेली किंवा पानाच्या अक्षकोनात काही मुंडके एकत्र झालेली. फळांवरचे केस सुमारे १.७ से. मी. लांब, उपकेस असलेली, फळे झालेल्या फुलांच्या मुंडकाना चमत्कारिक मऊ स्वरूप देणारे.

## वितरण

काश्मिर आणि त्या लगतच्या भागात २५०० ते ४००० मीटर उंचीवर हे झाड सापडते. जम्मू काश्मिर आणि हिमाचल प्रदेशाच्या जंगल खात्यांनी या झाडाची लागवड केली आहे आणि सुमारे ७००० क्विंटलस इतक्या मुळांचे दरवर्षी उत्पादन केले जाते.

## औषधी गुणधर्म

सॉस्यूरियाची वाळवलेली मुळेच औषध असतात. हे औषध पूतिनाशक आणि रोगजंतूनाशक आहे ते श्वासनलिका सुजण्यावर, दम्यावर, पोट फुगण्यावर आणि काही प्रकारच्या हृदयाच्या विकारांवर उपयोगी आहे. ते लघवी होण्यासपण मदत करते. यात अनैच्छिक स्नायूंना शिथिल करण्याचे गुणधर्म आहेत आणि यामुळेच हे श्वासनळ्याचा

सुजण्याचा दमा आणि कफावर योग्य परिणाम करते. हा परिणाम मात्र तात्पुरता असतो.

हे औषध त्वचारोगावर आणि संधिवातावर उपयोगी असल्याचे सांगण्यात येते.

प्रयोगाद्वारे असे दिसून आले आहे की पेट्रोलियम इथरमध्ये विरघळणारी, मुळांतील तत्त्वे काढल्यावर ती श्वासनलिकांच्या सुजण्यावर योग्य परिणाम करतात.

कूथच्या निर्यातीवर मर्यादा आहे. २ लाख रुपयाचे कूथ १९७७-७८ साली निर्यात करण्यात आले होते.

## इतर जाती

या प्रजातीच्या काही जाती हिमालयात सापडतात; त्याचा औषधी उपयोग मात्र मर्यादित स्वरूपाचा आहे.

हिमालयातील हिमाचल प्रदेशापासून ते सिक्कीमपर्यंतचा उंच भाग कूथच्या लागवडीसाठी योग्य समजण्यात येतो.

# ७०. चिकना

**सायडा कॉर्डिफोलिया**

*कुल* : मालवेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *चिकना*
हिंदी - *खरेंटी, कुंगी*
बंगाली - *बला*
गुजराती - *बलादाना*
मल्याळी - *काट्टूरम*
उडिया - *बडियानानला*
संस्कृत - *जयंती*
तामिळ - *आखिलमणइप्पुंड*
तेलुगू - *चीरूबेंडा*

कॉर्डिफोलिया हे शास्त्रीय नाव पानाचा हृदयाकृती आकार दर्शविणारे आहे.

## वर्णन

लहान, बहुशाखीय क्षुप; झाडाच्या सर्वांगावर ताराकृती केश; पाने २-५ से. मी. अंडाकृती किंवा गोलाकार, जाड, कडा दातेरी; पर्णवृंत्त पात्यापेक्षा लहान. फुले पिवळी, लहान, एक किंवा दोन एकत्र; फळे ६-८ मि. मी. परिघाची ७-१० भागांत

विभागलेली, प्रत्येक भाग जाळीदार व टोकास दोन शिंगासारख्या काट्यांनी युक्त.

## वितरण

हे झाड खुरटलेल्या झाडांच्या जंगलात आणि ओसाड जागी भारतात सर्वत्र सापडते.

## औषधी गुणधर्म

संपूर्ण झाडच औषधी म्हणून वापरण्यात येते.

चिकना एक सर्वसाधारण शक्तीवर्धक म्हणून आणि लैंगिक शक्ती वाढवण्यासाठीही वापरले जाते. बियांमध्ये प्रामुख्याने हे गुणधर्म आहेत. मुळांचा आल्याबरोबर काढा काढतात तो काही ठराविक ज्वरावर उपयोगी समजला जातो. या झाडाच्या मुळांच्या सालीची भुकटी स्त्रियांच्या श्वतप्रदर आणि मज्जासंस्थेच्या आजारात देण्यात येते. मुळांचा रस जखमा शीघ्र भरून निघण्यासाठी वापरण्यात येतो. मुळाची साल, तिळाचे तेल आणि दूध यांचे मिश्रण ठराविक प्रकारच्या चेहऱ्याच्या पक्षाघातावर परिणामकारक आहे.

चिकन्याच्या बिया परम्यात आणि पोटशुळात उपयोगी समजण्यात येतात.

## इतर जाती

सायडा या प्रजातीच्या महत्त्वाच्या औषधी वनस्पती : *सायडा ॲक्यूटा* Burm. f. बंगाली, हिंदी - *बनमेथी*, संस्कृत - *बाला*) ची मुळे मज्जासंस्थेच्या आणि मूत्रउत्सर्जनाच्या रोगांवर, ज्वरात आणि उंदराच्या रोगांवर उपयोगी आहेत. पानामध्येही औषधी गुणधर्म असल्याचे समजले जाते. *सायडा ऱ्हॉम्बिफोलिया* L. (हिंदी - *श्वेत-बरेला*, संस्कृत - *अतिबाला*) हे झाड संधिवाताच्या दुखण्यावर, फुफ्फुसांच्या क्षयात, आणि एक वेदानानिवारक म्हणून उपयोगी आहे.

*सायडा स्पायनोसा* L. (हिंदी - *गुलसकरी*, संस्कृत - *नागबाला*) मूळ आणि मुळांची साल मूत्राशयातील आग होण्यावर, ती कमी करण्यासाठी, परम्यात, ज्वरात आणि पौष्टिक म्हणून उपयोगी आहे. पानामध्येही असेच गुणधर्म आहेत.

# ७१. भुईरिंगणी

**सोल्यानम सुराटेन्स** Burm. f. **सो. झॅन्थोकारपम** Schrad & Wendl.

*कुल :* सोल्यानेसीई

*भारतीय नावे :* हिंदी - *काटेरि रिंगणी*
आसामी - *कटसरेया*
बंगाली, कानडी, संस्कृत - *कंटकारी*
गुजराती - *भुईरिंगणी*
उडिया - *बृहति बैंगनी*
पंजाबी - *कंडियारी, मोकरियान*
तामिळ - *कंदनगट्टारी*
तेलुगू - *छल्लनमुलगा, नेलमुलका*

## वर्णन

बहुशाखीय, काटेरी औषधी, बहुधा जमिनीवर पसरणारी; कोवळ्या फांद्या ताराकृती बारीक केसांनी दाटपणे आच्छादलेल्या; काटे पिवळे, चमकदार, सुमारे १.५ से. मी. लांब; पाने १० से. मी. लांब, मध्यशिर आणि उपशिरांवरही तीक्ष्ण पिवळे काटे; फुले जांभळी, सुमारे २ से. मी. लांब, लहान गुच्छांमध्ये थोडे एकत्र गुच्छ, पानांच्या संमुख; फळ १.५-२ से. मी. गोल पिवळे किंवा पिंगट हिरव्या शिरांनीयुक्त.

## वितरण

हे झाड ओसाड जागी, रस्त्याच्या बाजूला आणि खुल्या खुरट्या मैदानात, भारतात सर्वत्र सापडते.

## औषधी गुणधर्म

भुईरिंगणीची वाळवलेली मुळे औषध आहे. हे औषध कफ, दमा, छातीतील वेदना आणि काही प्रकारच्या तापांवर वापरले जाते. ते लघवी होण्यासाठी आणि मुतखड्यावर उपयोगी समजले जाते. खोडांची आणि फळांची जीवाणुनाशक क्षमता सप्रयोग दाखवण्यात आली आहे. या झाडाची फळे अनेक रोगांमध्ये उपयोगी असल्याचे समजण्यात येते. उदा. घशाच्या क्षतात, श्वासनलिकांच्या सुजण्यावर, स्नायूंच्या वेदनांवर वगैरे. मात्र भारताच्या औषध कोषात किंवा युनायटेड स्टेटसच्या औषध कोषात या झाडाचा उल्लेख नाही.




रेखाचित्र क्र. २० सोलॅनम इनकॅनम

पाने आणि खोडांच्या संततिनिरोधक गुणांसाठी प्राण्यांवर चाचण्या घेण्यात आल्या, अशा प्रकारचा गुणधर्म मात्र त्यात आढळून आला नाही. या झाडाचे अनेक अवयव सर्पदंशावर उपयोगी आहेत असा समज होता, परंतु प्रयोगाअंती त्यास काहीही पुष्टी मिळाली नाही.

(बस्तरचे आदिवासी फळे कुसकरून त्याचा रस डोळे दुखण्यावर डोळ्यात टाकतात.)

## इतर उपयोग

कोवळी पाने आणि फळे योग्य प्रक्रियेनंतर भाजीपाला म्हणून खातात.

## इतर जाती

*सोल्यनम नीग्रम* L. (*ब्लॅक नाइट शेड;* बंगाली - *गुडकामनी, काकमची;* हिंदी - *घामाइ, मकोइ,* कानडी - *काचिगिडा;* पंजाबी - *पिलक*) हे अनेक भारतीय औषधींत एक घटक म्हणून वापरले जाते. या झाडाचा काढा हगवणीवर, उदराचे इतर विकार आणि ज्वरावर उपयोगी आहे. झाडाचा रस क्षतावर आणि इतर त्वचारोगांवर उपयोगी आहे. या झाडाची फळे पौष्टिक आणि सौम्य रेचक आहेत, शिवाय भूक वाढवणारी आहेत. दमा, त्वचारोग, मूत्रउत्सर्जनाद्वारे जाणारे पदार्थ, खूप तहान लागणे इत्यादींवरही उपयोगी आहे. हिरवी फळे कुटून नायट्याच्या जागी लावली जातात.

या प्रजातीच्या ज्या इतर जातीत औषधी गुणधर्म असल्याचे समजले जाते त्या *सोलॅनम डलकॅमारा* L. (बिटर *नाईट शेड;* संस्कृत - *काकमचि*); *सोलॅन्म फेरॉक्स* L.(बंगाली, हिंदी - *रामबेगुन;* संस्कृत - *चंद्रपुष्पा*); *सोलॅन्म इनकॅनम* L. (आ. २० हिंदी - *गागलिभाटा, आसिंद*) आणि *सोलॅनम* इंडिकम L. (बंगाली - *तिता भेकुरि,* संस्कृत - *बृहतिका*)

सोल्यासोडिनचे स्रोत्र म्हणून अलीकडे *सोलॅनम व्हाएरम* Dunal ला बरीच प्रसिध्दी मिळाली आहे. कलकत्ता आणि इतर ठिकाणी यावर संशोधन चालू आहे.

## लागवडीखालील जाती

या प्रजातीची म्हणून महत्त्वाची जाती व त्यात असलेल्या काही औषधी गुणधर्मामुळे वांग्याचा (*सोलॅनम मेलोंजना* L.) उल्लेख करणे आवश्यक आहे. त्याची परिपक्व फळे हृदयासाठी बलवर्धक, क्षुधावर्धक आणि रक्ताची वृध्दी करणारी आहेत. पिकलेली फळे रेचक आहेत पण पित्तप्रकोप वाढवणारी आहेत. पाने कुटून ती गुप्तरोगाच्या जखमांवर लावण्यात येतात आणि वांग्याच्या मुळांचा काढाही या रोगावर देण्यात येतो.

बटाट्याचेही (*सोलॅन्म ट्यूबरोजम्* L.) काही औषधी उपयोग आहेत. बटाटे उकळलेले पाणी चेहऱ्यावरील पुरळांवर, कातडीवरील पुटकळ्यांवर आणि भाजण्यावर

उपयोगी आहे. बटाट्यातील तवकीर त्वचारोगांवरच्या काही मलमात आणि गोळ्या वगैरेत वापरतात.

## नवीन जाती

या प्रजातीतील काही विदेशी जाती वाढवण्याचे प्रयत्न करण्यात येत आहेत. उदा. *सोलॅनम ॲव्हिक्युलारे* Forst. f. काश्मिरमध्ये लावण्यात येते आणि त्यापासून निघणारे 'सोलॅसिडीन' हे लिंग संप्रेरक मिळवण्यासाठी उपयोगात आणतात.

# ७२. कुलू

**स्टर्क्यूलिया युरेन्स** Roxb.

*कुल :* स्टर्क्यूलिआसाई

*भारतीय नावे :* मराठी, पंजाबी - *कुलू*
हिंदी - *कुलू, गुलू, कडई*
गुजराती - *कंडोल, कडीयो*
कानडी - *भूताली*
मल्याळी - *तुंटी*
उडिया - *ग्रिंडोला*
तामिळ - *वेल्लाईप्पुत्ताली*
तेलुगू - *पोणाकू*
(संथाल परगणा - *तेलहैच*)

मध्यम आकाराचा पानझडी वृक्ष, जंगलात त्याच्या पांढऱ्या किंवा हिरवट पांढऱ्या, चमकदार, कागदासारख्या सालीमुळे ठळकपणे ओळखू येणारा. पाने शाखांच्या टोकास एकत्र जमा झालेली, मोठी २०-४० से. मी. परिघ असलेली, कमी प्रमाणात पाच पाळ्यांत विभागलेली, खालील पृष्ठभागात फार दाटपणे केसाळ; फुले पिवळसर तपकिरी, लहान, मोठ्या दाट केसाळ गुच्छांमध्ये; फळ ४-५ लाल जाड अंड्यापासून बनलेले, वेदनाजनक किंवा खाजणाऱ्या केसांनी दाटपणे आच्छादलेले.

## वितरण

हे झाड हिमालयातील उष्ण भागात पूर्व, मध्यम आणि दक्षिण भारतात सामान्यपणे कोरड्या किंवा मिश्रित पानझडी जंगलात सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडापासून निघणाऱ्या डिंकात औषधी गुणधर्म आहेत. त्यास कडाया डिंक किंवा करीरा डिंक म्हणतात. या डिंकाचा सौम्य रेचक म्हणून वापर होतो. कराया डिंक कातडीवर ट्रॅगकॅन्थ डिंकापेक्षा मऊ वाटतो. कडाया डिंक ट्रॅगकॅन्थ डिंकाऐवजी घशातील संसर्गजन्य रोगात, नकली दात बसवण्याच्या मसाल्यात वापरतात. (बस्तरचे आदिवासी या झाडाची साल कुटून स्त्रीला सुलभ प्रसूतीसाठी देतात.)

## इतर उपयोग

या झाडाचे लाकूड किरकोळ खोक्यांसाठी, दारे, बोटी व कोरीव कामासाठी वापरतात. सालीपासून मजबूत धागा निघतो. तो दोरीसाठी आणि जाड कापडासाठी मोठ्या प्रमाणावर वापरला जातो. या झाडाच्या बिया खाण्यायोग्य आहेत. डिंक भाज्यांमध्येही वापरला जातो.

१९७७-७८ साली ८० लाखाचा कराया डिंक निर्यात केला गेला. या प्रजातीच्या इतर दोन जाती, *स्टर्क्यूलिया व्हिलोसा* Roxb (हिंदी - *उदल;* उडिया - *कोदालो*) भारतात सगळीकडे मिळते आणि स्टर्क्युलिया फीटिका L (जंगली बदाम) दक्षिण भारतात आढळते व त्यापासून औषधी पदार्थ मिळतात. *स्टर्क्यूलिया व्हिलोजापासून* मिळणारा डिंक गम ट्रॅगकाँथ ऐवजी वापरण्यात येतो. *स्टर्क्यूलियाफिटीडाच्या* बियांपासून काढलेले तेल सौम्य रेचक आहे.

# ७३. चिरागिता

**स्वेर्शिया चिरायिता** (Roxb.) Karst.

*कुल :* जेनसियानेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *चिरागिता*
हिंदी - *चिरायता*
बंगाली - *चिराटा*
कानडी - *नेलाबेव*
संस्कृत - *किराततिक्त*
तामिळ, तेलुगू - *नील बेंबु*

स्थानिक भारतीय नावावरून या झाडाचे व्यावहारिक नाव घेण्यात आले आहे.

## वर्णन

१.५ मीटर उंचीची वार्षिक औषधी; पाने संमुख जोड्यांमध्ये, सुमारे १० से. मी. लांब, पर्णवृंतरहित, अग्रास टोकदार; फुले फिकट हिरवी, जांभळे ठिपके असलेली, प्रत्येक दल ग्रंथीच्या एक जोडीनेयुक्त; फळ ६ मि. मी. किंवा जास्त लांब, अंडाकृती.

## वितरण

काश्मिर ते आसामपर्यंत शीतकटिबंधीय हिमालयात १२०० ते ३०० मीटर उंचीवर चिरागिता मिळते.

## औषधी गुणधर्म

झाडांना फुले लागल्यावर ती जमा करून वाळवली जातात, हेच चिरागिता औषध असते.

चिरागिता त्याच्या कडू, तापनाशक आणि कृमिनाशक गुणधर्मांमुळे प्रसिध्द आहे. याचे गुणधर्म जेन्शन (*जेन्शियाना कुरूरोआ*) सारखेच आहेत ते तापात, अतिसारात व अशक्तपणावर देण्यात येते. ते मलेरियाच्या तापातही देण्यात येते. तापनाशक गुणधर्मांसाठी अलीकडे काही प्रयोग करण्यात आले असता त्यांचे निष्कर्ष नकारात्मक असल्याचे आढळून आले आहे.

स्वेर्शिया या प्रजातीच्या ७-८ जाती भारताच्या डोंगराळ भागात मिळतात आणि त्यांचा उपयोग चिरागितासारखाच करण्यात येतो.

भारताची चिरागिताची वार्षिक गरज ४०० क्विंटल्सची आहे. या झाडाच्या लागवडीचे क्षेत्र वाढवण्याची शिफारस करण्यात आली आहे. हिमालयातील उंच पर्वतमय भागात, काश्मिर, हिमाचल प्रदेश, पंजाब, उत्तर प्रदेश आणि आसामपर्यंतचा भाग *स्वेर्शिया चिराईताच्या* लागवडीसाठी योग्य असल्याचे सूचित करण्यात आले आहे.

# ७४. लोध्र

**सिम्प्लोकॉस रेसिमोझा** Roxb.

*कुल* : सीम्प्लोकेसीई

*भारतीय नावे* : मराठी, संस्कृत - *लोध्र*

हिंदी - *लोध*

आसामी - *लापोंग-डांग, डिएंगलमकी*

बंगाली - *लोध*

गुजराती - *लोदरा*

तेलुगू - *लोडडुगू*

(सिंगभूम - *लुडमदारू*)

लोध्र या संस्कृत नावावरून डोळ्यातील स्राव थांबवणारा असा बोध होतो.

## वर्णन

६ मीटर उंचीचा लहान वृक्ष; पाने ८-२० से. मी. लांब, गर्द हिरवी, कातडी पोताची. बहुत करून अग्रास टोकदार, कडा साध्या किंवा दातेरी, पर्णवृंत्त लहान, सुमारे २० से. मी. लांब, फुले लहान, सुमारे १.२ से. मी. परिघाची, पांढरी किंवा फिकट पिवळी, पानाच्या अक्षकोनात लहान गुच्छामध्ये; फळ १-१.३ से. मी. लांब जांभळट काळे.

## वितरण

हे झाड पूर्व आणि मध्य भारतात डोंगराच्या उतरणीवर व पायथ्याशी सापडते.

## औषधी गुणधर्म

लोध्र म्हणजे या झाडाची शुध्द हवेत वाळवलेली साल होय. हे औषध पचनाचे विकार, डोळ्यांचे विकार आणि क्षतावर उपयोगी आहे. हिरड्यातून निघणाऱ्या रक्तस्रावर या झाडाच्या सालीचा काढा गुळण्या करण्याकरिता वापरतात. हे प्लास्टर म्हणून वापरण्यात येते आणि जखम लवकर भरून यावी म्हणून जखमेवरही लावण्यात येते. मासिक पाळीत होणारा अतिस्राव लोधच्या संकुचन गुणधर्मामुळे कमी होतो. या गुणधर्मामुळे या हगवणीवरही वापरले जाते. यास हत्तीरोगात व मूत्रोत्सर्जनातून मेदपदार्थ जाण्यात उपयोगी समजण्यात येते.

## इतर जाती

सिंप्लोकॉस या प्रजातीची *सिम्प्लोकॉस पॅनिक्युलॅटा* Wall ही जाती हिमालयामध्ये पंजाब ते आसाम दरम्यान सापडते. या झाडाच्या सालीचा उपयोग लोध्र प्रमाणेच.करण्यात येतो व तीस टॉनिक समजण्यात येते.

# ७५. जांभुळ

**सायझीजियम क्यूमिनी** (L.) Skeels. syn. **युजेनिया जांबोलाना** Lam. **आकृती २१**

*कुल :* मिर्टेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *जांभुळ*
हिंदी - *जामुन*
आसामी - *जामु*
बंगाली - *जाम, काला जाम, बडा जाम*
गुजराती - *जाम्बु*
मल्याळी - *यावेल*
उडिया - *जामकुक*
संस्कृत - *जंबूल*
तामिळ - *नगई, सांबल*
(ललितपूर, उत्तर प्रदेश - *काठ जामुन*)

सर्वपरिचित भारतीय नावावर या झाडाचे व्यावहारिक नाव आधारित आहे.

## वर्णन

सदाहरित, मोठा वृक्ष; पाने संमुख, ८-२० से. मी. लांब, चर्मिल, गुळगुळीत, चमकदार; फुले लहान, मळकट पांढरी, मोठ्या गुच्छांमध्ये; फळ १.५-४ से. मी. लांब, अंडाकृती, अपरिपक्व जांभळट, पक्व फळ बहुधा काळे, रसदार; बी एक, फळे पिकल्यावर खाण्यात येतात. जांभळ्या गरामुळे जीभ व ओठ अनेक तास जांभळे राहातात.

## वितरण

हा वृक्ष मुख्यतः ओलसर पानझडी जंगलात विशेषतः नदी नाल्यांच्या काठावर आढळतो. फार कोरड्या भागात तो नैसर्गिक अवस्थेत सापडत नाही. तथापि त्याची मुद्दाम लावलेली, संरक्षित झाडे राजस्थानच्या वाळवंटातसुध्दा जगतात.



रेखाचित्र क्र. २१ जांभुळ (सायझीजियम क्यूमिनी)

## औषधी गुणधर्म

या झाडाची साल, फळे आणि बिया औषधी आहेत. साल फार तुरट आहे आणि ती घशाच्या क्षतात, श्वासनलिकांच्या सुजण्यावर, दम्यात, क्षतांत आणि अतिसारावर वापरली जाते. ती रक्त शुध्दिकरणासाठी देण्यात येते. अतिसारावर सालीचा ताजा रस बकरीच्या दुधात देण्यात येतो.

बिया मधुमेहावर फार उपयोगी आहेत. फळाच्या गरातपण तो गुणधर्म आहे परंतु बियांपासून तयार केलेले औषध जास्त गुणकारी आहे. हे औषध इंजेक्शनद्वारे दिल्यासच परिणामकारी आहे. या औषधाचे सेवन केल्यास परिणाम दिसत नाही.

या औषधाचा मधुमेहविरोधी गुणधर्म होनी (इंडियन किनोट्री) पेक्षा सरस आहे.

## इतर उपयोग

पिकलेली फळे खाण्यात येतात. लाकूड किरकोळ कामासाठी वापरण्यात येते.

## इतर जाती

या प्रजातीची दुसरी महत्त्वाची जाती औषधात वापरली जाते ती *सायझीजियम ॲरोमॅटिकम* (L.) Merr & Perry. (syn. *युजेनिया कॅरीओफिलॅटा* Thunb., *क्लोव्ह,* हिंदी - *लवंग, लउंग*) आहे. लवंग म्हणजे या झाडाच्या फुलांच्या वाळवलेल्या कळ्या. त्या तीव्र सुगंधी, उत्तेजक आणि बध्दकोष्ठतानाशक आहेत. त्या पोट फुगण्यावर, अपचनावर, मळमळ व वांत्या थांबवण्यावर उपयोगी आहेत.

लवंगाचे तेल पूतिनाशक आणि संरक्षक आहे. मुखाद्वारे घेतल्यास त्याचा पोटातील मुरड्यावर व वातबध्दतानाशक म्हणून उपयोग होतो. १९७०-७१ साली एक लाख रुपये किंमतीचे लवंगतेल आयात करण्यात आले.

# ७६. चिंच

**टॅमॅरिंडस इंडिका** L. **आकृती २२**

*कुल :* सीझालपिनिअेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *आमली, चिंच*

हिंदी - *इमलि*

बंगाली, गुजराती - *आंबली*

कानडी - *हुनसेमरा, चिंच*

मल्याळी - *आम्लम, वालमपुली*

उडिया - *तेंतुली*

संस्कृत - *आम्लिका*

तामिळ - *पुलि*

तेलुगू - *आम्लिका*

## वर्णन

मोठा वृक्ष; पाने संयुक्त; पर्णिकांच्या १०-२० जोड्या, सुमारे १ से. मी. लांब; फुले पिवळसर आणि तांबुसआरक्त रंगाच्या रेखा असलेले, पानांबरोबर सरळ-ताठ, लहान गुच्छांमध्ये; फळे ८-२० से. मी. लांब, २-३ से. मी. रुंद, गरदार, लटकणारी, तपकिरी रंगाची; बिया ३-१२, गर्द तपकिरी, चमकणाऱ्या, तंतूमय गरात फसलेल्या (यास चिंचेचे आल्मगर म्हणतात).

## वितरण

मध्य आणि दक्षिण भारताच्या भागांमध्ये हा वृक्ष नियमितपणे सापडतो, आणि संपूर्ण भारतात रस्त्याच्या कडेला व बागांमध्ये लावला जातो.

## औषधी गुणधर्म

फळांचा गर औषधी आहे. चिंचेच्या गरात सौम्य रेचक गुणधर्म आहेत. त्याचा पाण्यातला काढा उत्साहवर्धक पेय आहे. ते तापात उपयोगी आहे. रेचक म्हणून ते इतर रेचकांबरोबर किंवा नुसतेच घेण्यात येते. ते दुसऱ्या जुलाबाच्या औषधाबरोबर दिल्याने त्याचा रेचक गुणधर्म कमी होतो.




रेखाचित्र क्र. २२ चिंच (टॅमॅरिडस इंडिका)

## इतर उपयोग

या झाडाच्या लाकडामध्ये किटकांना प्रतिकार करण्याची क्षमता असते म्हणून यास शेती औजारे, घरगुती वस्तू आणि लाकडी सामान वगैरेसाठी मोठ्या प्रमाणावर वापरतात. त्यापासून चांगल्या प्रतीचा कोळसा तयार होतो आणि बंदुकीच्या भुकटीसाठीपण वापरले जाते. पानांमधून पिवळा रंग निघतो. चांदीची, पितळेची भांडी आणि इतर भांडी स्वच्छ धुण्यासाठी फळांच्या आम्लीय गराचा उपयोग होतो. बिया मुरंब्याच्या आणि जेलीच्या कारखान्यात वापरतात. बियांची भुकटी कपड्यास स्टार्च देण्यासाठी तसेच लाकूड जोडण्याच्या मसाल्यात वापरण्यात येते.

# ७७. **बिहाडा** (बेलेरिक मायरोबालान)

**टर्मिनालिया बेलेरिका** (Gaertn.) Roxb.

*कुल :* कॉम्ब्रिटेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *बिहाडा*
आसामी - *भोविआन, हुल्लुच*
बंगाली, गुजराती, पंजाबी - *बिहाडा*
संस्कृत - *तेलफल*
तामिळ - *अक्कम, तानरी*
तेलुगू - *टाझी, टान्ड्रा*
(चितगांव - *बोआरा गोटा, सन्ताळ - लोपोन*)

बिहाडा हे व्यावहारिक नाव या झाडाच्या भारतीय नावावरून घेण्यात आले आहे. बेलेरिक हा शब्द या झाडाच्या शास्त्रीय नावावरून घेण्यात आले आहे, आणि तो *चेब्युलिक मायरोबालान* पासून हे मायरोबालान वेगळे दाखवण्यासाठी वापरण्यात आले आहे.

## वर्णन

बहुतेक वेळेस वप्र असलेले फार मोठे झाड; पाने मोठी १०-२५ से. मी. लांब, फांद्याच्या टोकाजवळ, गुच्छांमध्ये; फुले लहान, फिकट हिरवी, दुर्गंधीयुक्त, साध्या कणिसांमध्ये; फळ २-३ से. मी. लांब, अंडाकृती, तपकिरी, दाट केसांनी आच्छादलेले.

## वितरण

कोरड्या पश्चिम भारताशिवाय भारतात बहुधा सगळीकडे १०० मीटर उंचीवर मिळते. ते संमिश्र पानझडी जंगलात नियमितपणे सापडते.



रेखाचित्र क्र. २३ अर्जूसादडा (टर्मिनालिया आर्जूना)

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली फळे म्हणजे बिहाडा औषध आहे. ही फळे अपचन, अतिसार इत्यादी पोटांच्या विकारावर उपयोगी आहे. अर्धवट पिकलेली फळे रेचक समजण्यात येतात, परंतु पक्व फळे मात्र या विरुध्द गुणधर्म दाखवतात.

प्रसिध्द भारतीय औषध त्रिफळामधील बिहाडा हे एक घटक आहे, दुसरी दोन आवळा आणि हिरडा आहेत.

## इतर उपयोग

या झाडाचे लाकूड पाण्याखाली चांगले राहते म्हणून बोटीसाठी वगैरे वापरण्यात येते, किरकोळ शेती औजारासाठीही वापरण्यात येते.

बिहाडाच्या फळामध्ये 'टॅनिन' असते, ते कातडी कमावण्यासाठी व कपडे आणि कातडी रंगवण्यासाठी वापरले जाते. शाई तयार करण्यासाठीही हे वापरले जाते.

## इतर जाती

टर्मिनालिया या प्रजातीमध्ये अनेक जाती औषधीदृष्ट्या महत्त्वाच्या आहेत. *टर्मिनालिया चेब्युला* Retz. चेही बेलिरिक मायरोबालान् सारखे वितरण आहे. काही जुन्या लिखाणात यास अव्यथा संबोधिले आहे याचा अर्थ व्यथावेदना मिटवणारा आहे. तो मध्यम किंवा मोठ्या आकाराचा वृक्ष असतो. पाने १०-२० से. मी. अंडाकृती, तीक्ष्ण आग्र, फांद्याच्या टोकास एकत्र गुच्छात न येणारी, परंतु जवळ जवळ संमुख जोड्यांमध्ये. पानाच्या खालच्या भागास (पर्ण अग्रास विरुध्द बाजूस) दोन लहान ग्रंथी. फुले पिंगट पांढरी, शाखांच्या टोकास, कणिसात. फळ २-४ से. मी. लांब, त्यावर उठलेल्या पाच ठळक शिरा. यास मराठीत हिरडा म्हणतात.

या झाडाची वाळवलेली फळे म्हणजे सर्वज्ञात चेब्युलिक मायरोबालान किंवा हारा औषध आहे. मायरोबालान बाहेरून जुन्या क्षतांवर, जखमांवर लावले जाते आणि तोंड येणे किंवा सुजणे या चूळ भरण्यासाठी वापरले जाते. मायरोबालानस रेचके म्हणून वापरली जातात. हृदयाचे शक्तिवर्धक म्हणून त्यांचा रक्तदाबावरही परिणाम दिसून आला आहे. फळांची भुकटी हिरड्यांच्या मजबुतीसाठी दंतमंजन म्हणून वापरण्यात येते. सुप्रसिध्द 'त्रिफळा' औषधात हिरडा हा एक घटक आहे. भारतात हिरड्यापासून बनवलेली मिठाई आणि लोणच्यात सर्वसामान्यपणे वापरले जाते. त्यास पाचक आणि सौम्य रेचक समजण्यात येते.

४ लाख रुपयाचे हिरडा, बिहाडा १९७७-७८ साली निर्यात करण्यात आले.

आर्जून सादडा *टर्मिनालिया आर्जुना* Wight & Anold. आकृती २३ हिंदी - *अर्जून कहू, कोवहा;* संस्कृत - *इंद्रद्रुम*) भारतात बहुधा सगळीकडे विशेषतः नाल्यांच्या, नद्यांच्या काठावर आणि ओलसर जागी सापडते. याची साल तुरट असते. ज्वरामध्ये आणि हाडाच्या तुटण्यावर, मुक्क्यामारावर उपयोगी आहे. ती हृदयाचे शक्तिवर्धक म्हणूनही घेण्यात येते.

जुन्या साहित्यात यास नदीसरजा म्हणजे नदीच्या काठी उगवणारा म्हटले आहे.

## ७८. गुळवेल

**टिनोस्पोरा कॉर्डिफोलिया** (Willd.) Hook f. & Th.

*कुल :* मेनिस्पर्मेसीई

*भारतीय नावे :* मराठी - *गुळतेल*
हिंदी - *गिलोया, गिलो*
बंगाली - *गुलंचो*
गुजराती - *गुळवेल*
कानडी - *अनेबुले, अमृतवल्ली*
मल्याळी - *आमृतु*
तामिळ - *अमृतवल्ली*
तेलुगू - *गुडुची*
(मद्रास - *थिप्पाथेगा*)

गुळवेल हे व्यावहारिक नाव या झाडाच्या स्थानिक नावावरून घेण्यात आलेले आहे.

### वर्णन

जाड रसदार खोडांची मोठी वल्ली; खोडापासून वडासारखी निघणारी आरोही मुळे; खोडे आणि फांद्यावर ग्रंथींचे ठिपके; पाने ५-१० से. मी. अंडाकृती किंवा गोलाकार, ७-९ शिरांसह; पर्णवृंत्त पानांपेक्षा थोडेसे छोटे; फुले लहान, पूंपुष्प आणि स्त्रीपुष्प वेगवेगळे; पूंपुष्पे सहपत्राच्या अक्षकोनाच्या समूहात; स्त्री पुष्पे एक एक; फळ वाटाण्याच्या आकाराचे लाल.

### वितरण

हे झाड भारताच्या उष्ण भागात सर्वत्र मिळते.

### औषधी गुणधर्म

या झाडाची साल असलेली खोड उन्हाळ्यात जमा करण्यात येतात व वाळवण्यात येतात. हेच गुळवेल औषध आहे.

गुळवेल हे औषध शक्तिवर्धक आणि मुदतीच्या आजारावर उपयोगी समजण्यात येते. ते कामोद्दीपकही समजण्यात येते.

या झाडाच्या मुळा व खोडापासून काढलेले तवकीर अतिसारात उपयोगी आहे. ते बलवर्धकही आहे.

# ७९. घोळ (बिशखापरा)

**ट्रयअॅन्थेमा पोर्च्युलॅकॅस्ट्रम्** L. syn. **ट्रायअॅन्थेमा मोनोगायना** L. **आकृती २४**

*कुल :* फिकॉइडिई

*भारतीय नावे :* हिंदी - *लालसाबुनी*
बंगाली - *साबुनी*
गुजराती - *साटोडी*
कानडी - *मुच्छूजोनी*
पंजाबी - *बिशखापरा*
संस्कृत - *पुनर्नवी*
तामिळ - *शारून्नई*
तेलुगू - *गलीजेरू*

## वर्णन

रसदार, पसरणारी औषधी, खोडे बहुशाखीय, कोन असलेली; पाने अग्राकडे रुंद; फुले फार लहान, पर्णवृंत्ताच्या खालच्या भागात पूर्णपणे लपलेली; फळे लहान, फुलांप्रमाणेच पानाच्या पर्णवृंत्ताच्या खालच्या भागात लपलेली; बिया अनेक, काळ्या, मूत्रपिंडाच्या आकाराच्या, आवरणापासून निघालेल्या बाह्य वाढींनी आच्छादलेला.




रेखाचित्र क्र. २४ घोळ (ट्रायन्थेमा पोर्टच्यूलाकास्ट्रम)

## वितरण

हे झाड भारतात सगळीकडे सापडते. भाजीच्या घोळापेक्षा (*पोर्च्युलॅका ओलेरिशिया*) हा घोळ निराळा असतो. हा पाणी दिलेल्या शेतात व पावसाळ्यात शेतांमध्ये तण म्हणून उगवतो.

## औषधी गुणधर्म

या झाडाची पाने औषधी आहेत. पानांमध्ये 'पुनर्नविन' नावाचे अॅल्कलाइड् असते. ते मूत्रविरेचक आहे. म्हणूनच जलोदरात उपयोगी आहे. यकृत किंवा मूत्राशयाच्या अकार्यक्षमतेमुळे शरीरावर होणाऱ्या फाजील वाढीवर (गाठी) हा घोळ उपयोगी आहे. विशेषकरून रोगाच्या प्राथमिक अवस्थेत परिणामकारक आहे. तसेच रोगाच्या विकसित अवस्थेतही उपयोगी आहे, परंतु ते कायम स्वरूपाच्या उपचारासाठी गुणकारी असेलच असे नाही.

या झाडात गर्भपात करण्याची क्षमता तपासण्यासाठी चाचण्या घेण्यात आल्या आहेत; गर्भाशयाला ते सौम्यपणे संकुचित करते.

## इतर जाती

या प्रजातीची *ट्रयअॅन्थेमा डिकॅन्ड्रा* ही दुसरी जातीसुध्दा औषधी आहे. मुळे रेचकयुक्त आहेत आणि मासिक पाळी बंद करण्यासाठी व अंडकोश सुजण्यावर उपयोगी आहेत. गर्भपातासंबंधीचे प्रयोग याही झाडावर झाले आहेत पण त्याचे निष्कर्ष निर्णायक स्वरूपाचे नाहीत.

# ८०. गोखरू (सराटा)

**ट्रिब्यूलस टेरेस्ट्रिस** L. **आकृती २५**

*कुल :* झायगोफिलसीई

*भारतीय नावे :* मराठी, बंगाली, गुजराती, पंजाबी - *गोखरू*
हिंदी - *छोटो गोखरू*
कानडी - *नेग्गलू*
मल्याळी - *नेरिंगिल*
संस्कृत - *लघु-गोक्षुर*
तामिळ - *नेरूंजी*
तेलुगू - *पल्लेरू*

या झाडाचे व्यावहारिक नाव स्थानिक भारतीय नावावरून घेण्यात आले आहे.



रेखाचित्र क्र. २५ गोखरू (सराटा) (ट्रिब्यूलस टेरेस्ट्रिस)

## वर्णन

जमिनीवर रांगणारी औषधी; संपूर्ण झाड बारीक केसांनी आच्छादलेले; पाने संमुख जोड्यामध्ये, ५-८ से. मी. लांब, संयुक्त; पर्णिका ४-७ जोड्या, ८-१२ मि. मी. लांब; फुले पिंगट पिवळी, १-१.५ से. मी. परिघाची, एक एक, पानाच्या अक्षकोनातून किंवा विरुध्द बाजूने निघणारी; फळ विशेष प्रकारचे आणि त्यावर असलेल्या काट्यांनी सहज ओळखता येणारे, फळे नेहमी कपड्यांना, जनावरांच्या शरीराला आणि वाहनांच्या चाकांना चिकटणारी. सायकल पंक्चर करणाऱ्या वस्तूमध्ये या फळांचाही सर्वसामान्यपणे समावेश होतो. या फळाच्या पाच भागांपैकी प्रत्येक भागांत अनेक बिया असतात.

## वितरण

३०० मीटर उंचीपर्यंत हे झाड भारतात सर्वत्र सापडते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची फळे म्हणजे औषध आहे. फळे मूत्रांच्या विकारावर, लैंगिक अशक्तपणात उपयोगी आहेत. ती शीतल आहेत. या फळांचा काढा संधिवातावर आणि मूत्राशयाच्या विकारावर उपयोगी आहे. ते मूत्रविरेचकपण आहे.

लघवी होण्यास मदत करण्याची या औषधाची क्षमता रुग्णांवर केलेल्या चाचण्यांनी सिध्द झालेली आहे.

*ट्रिब्युलस टेरेस्ट्रिसला* छोटा गोखरू म्हणून ओळखले जातो तर *पीडॅलियम म्यूरेकस* (पीडॅलिअेसीई) मोठा गोखरू म्हणून ओळखला जातो. अनेक आयुर्वेदिक औषधांत छोट्या गोखरूसारख्या गुणधर्मांसाठीही वापरला जातो.

# ८२. रानकंद

**अर्जीनिया इंडिका** (Roxb.) Kunth

*कुल* : लिलिअेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *रानकंद*

हिंदी - *जंगली प्याझ, बन प्याज, कोलिकंद*

बंगाली, गुजराती - *हिंदीसारखे*

संस्कृत - *कोलकंद*

तामिळ - *नारिवेंगायम*

तेलुगू - *नक्कवल्लिगड्डु*

या प्रजातीच्या युरोपियन जातीस 'स्किवल' हे नाव देण्यात आले आहे. या जातीऐवजी भारतीय जाती वापरण्यास चांगली आहे तिला भारतीय स्क्विल म्हटले जाते.

## वर्णन

कंदधारी झाड, कंद, ५-१० से. मी. मळकट पांढरे किंवा फिके, अंडाकृती; खालची पाने जवळपास सपाट, फार लांब, अरुंद, टोकदार; फुलांचे खोड ताठ, सुमारे ४५ से. मी. उंच; फुले फिकी तपकिरी, सडपातळ लांब गुच्छांमध्ये; फळ १.५-२ से. मी. लांब, दोन्ही टोकास अरुंद; बिया काळ्या.

## वितरण

हे झाड वायव्य हिमालयात २००० मीटर उंचीपर्यंत सापडते आणि दक्षिण भारतापर्यंत व पूर्वेकडे बिहारपर्यंत सापडते.

## औषधी गुणधर्म

कंदाच्या बाहेरचे कोरडे आवरण काढल्यावर कंदाचे तुकडे करून वाळवतात; हे रानकंद (भारतीय स्क्विल) या नावाने ओळखले जाते.

या औषधात जवळपास *डिजिटॅलिस्* सारखेच गुणधर्म आहेत, परंतु याची क्रिया हळूहळू होते व ते मोठ्या प्रमाणावर घेण्याची गरज असते. ज्यांना डिजिटॅलिसचा उपचार आवश्यक असतो पण डिजिटॅलिसला संवेदनक्षम असतात त्यांना 'रानकंद' हे औषध दिले जाते. ते हृदयाच्या, कफाच्या आणि श्वासनलिका सुजण्याच्या वेदनांवर वापरले जाते. ते मूत्रविरेचक आहे. युरोपियन स्क्विल प्रमाणेच भारतीय स्क्विलही

## ८१. पितकारी (अनंतमूळ)

**टायलोफोरा इंडिका** (Burm. f.) Merr. syn. **टायलोफोरा अस्थमॅटिका** Wt. & Am.

*कुल :* अस्कलेपिॲडेसिई

*भारतीय नावे :* मराठी - *पितकारी*
हिंदी, बंगाली - *अनंतमूळ*
मल्याळी - *वल्लिपाला*
उडीया - *मेन्डी*
तामिळ - *कागितम*

टायलोफोरा या नावानेही या झाडास ओळखले जाते. अस्थमॅटिका हे शास्त्रीय नाव याच्या दम्यावरील वापरामुळे दिले गेले आहे.

### वर्णन

लांब, रसदार मुळे असलेली औषधी; पाने संमुख जोड्यामध्ये, ५-१० से. मी. लांब अंडाकृती, बहुतेक अग्रास टोकदार; फुले मोठी, मळकट पिवळी, मधल्या भागात जांभळी, आखूड गुच्छांमध्ये; फळे ५-१० से. मी. लांब जोड्यांमध्ये, अग्रास टोकदार, वर आलेल्या अनेक धारांसह.

### वितरण

हे झाड पूर्व, मध्य आणि दक्षिण भारतात बहुधा सपाट जागेत १००० मीटर उंचीपर्यंतच्या डोंगराळ भागात सापडते.

### औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली मुळे म्हणजे औषध आहे. हे औषध इपेकॅकच्या ऐवजी वापरण्यास चांगले आहे आणि अतिसाराच्या उपचारात उपयोगी आहे. या औषधाचा काढा दम्यात आणि फुफ्फुसांच्या नळ्या सुजण्यावर देण्यात येतो आणि म्हणून दम्यात आराम मिळवण्यासाठी वापरले जाते.

परिणामकारक आहे. श्वासनलिका सुजण्यावरच्या जुन्या रोगांवर आणि पडसेसर्दीवर रानकांद्याच्या (इंडियन स्क्विल्) क्षमतेविषयी रुग्णांवर घेतलेल्या चाचण्यांनी खात्री पटली आहे. या औषधाची भारतातील मागणी १२० क्विंटल्स आहे. ते भारतात पठारावर बहुतेक सर्वत्र लावले जाऊ शकते.

# ८३. **कळवळा** (व्हेलेरियन्)

**व्हेलेरियाना ऑफिसिनॅलिस** L.

*कुल* : व्हेलेरियॅनेसीई

*भारतीय नावे* : मराठी - *कळवळा*

हिंदी - *बिल्लीलोटन, बदरंगबोया, जलाकन*

या झाडाच्या स्थानिक नावावरून या झाडाचे व्यावहारिक नाव घेण्यात आले आहे.

## वर्णन

१ मीटर उंच, बहुवर्षीय औषधी; मूलस्तंभ खोडयापेक्षा जाड व त्यापासून भूस्तरी निघतात; खोड खाचा असलेले, खालच्या भागात केसाळ, वर गुळगुळीत; खालच्या पानांची पर्णवृंत्ते लांब, वरची लहान; फुले पांढरी किंवा मळकट पांढरी, लहान शाखांच्या टोकावर, लहान गुच्छागध्ये; फळ लहान गुळगुळीत, केसरहित.

## औषधी गुणधर्म

या झाडाची मूलस्तंभे व मूळे म्हणजेच औषध असते. ही हिवाळ्यात जमा करून हळूहळू वाळवल्याने त्यापासून चांगले औषध मिळते.

कळवळा मध्य मज्जा संस्था मंद करते आणि हिस्टेरियल फिट्स, मज्जासंस्थेचे इतर विकार आणि पोट फुगल्यावर वापरले जाते. मूलस्तंभाचा आणि मुळांचा ताजा रस मादक (गुंगी आणणारा) आहे म्हणून निद्रानाशामध्ये आणि हृदयरोगाच्या इतर औषधात वापरले जाते.

## इतर जाती

या प्रजातीच्या इतर जाती *व्हॅलेरियाना वॅलिची* DC. हिमालयात काश्मिर-पासून आसामपर्यंत मोठ्या प्रमाणावर सापडते आणि याची गुणधर्म *व्हॅलेरियाना ऑफिसिनॅलिस* सारखेच गुणधर्म आहेत; ते एकाच प्रकारच्या रोगावर वापरले जाते.




रेखाचित्र क्र. २६ अश्वगंधा, आस्कंद (वियानिया सोमनीफेरा)

भारताच्या डोंगराळ भागात कळवळा (व्हॅलेरियन्) लावले जाऊ शकते. ५ लाख रुपयाची ६७ क्विंटलस् मुळे १९७४-७५ साली निर्यात करण्यात आली.

# ८४. अश्वगंधा

**वियानिया सोम्निफेरा** Dunal **आकृती २६**

*कुल :* सोलॅनिसीई

*भारतीय नावे :* मराठी - *आस्कंद, अश्वगंधा*
हिंदी - *अश्वगंधा*
गुजराती - *आसुन, घोडा-असोड, सांठियाना पोपटा.*
कानडी - *हिरेमद्दिनेगिड*
मल्याळी - *अमुक्किरम*
इतर भाषांत *अश्वगंधा.*

या झाडाचे व्यावहारिक नाव भारतीय स्थानिक नावावरून घेतले आहे.

## वर्णन

लहान किंवा मध्यम आकाराचा १.५ मीटर उंचीपर्यंत वाढणारा क्षुप; खोड व फांद्या बारीक, ताराकृती केसांनी आच्छादलेल्या; पाने १० से. मी. पर्यंत लांब; पानांच्या अक्षकोनातून काही फुले आखूड गुच्छांमध्ये एकत्र; फळ ६ मि. मी. परिघाचे, गोल, गुळगुळीत, लाल, फुगलेले पातळ दलपुंजात गुंडाळलेले.

## वितरण

हे झाड भारताच्या कोरड्या भागात सापडते. ते लावलेही जाते.

## औषधी गुणधर्म

या झाडाची वाळवलेली मुळेच औषधी आहेत. अश्वगंधा क्षयरोगावर, लैंगिक आणि सर्वसाधारण अशक्तपणावर आणि संधिवातावर उपयोगी आहे. ते मूत्रविरेचक आहे. ते निद्रानाशात, आणि शरीरातील अडथळ्यांविरुध्द उपयोगी आहे. मुळांची भुकटी क्षतांवर आणि सुजण्यावर लावली जाते.

अलिकडच्या प्रयोगांनी या औषधाची जीवाणूनाशक क्षमता सिध्द झालेली आहे.

## इतर जाती

*विथानिया कोॲग्युलन्स* Dunal (हिंदी - *अकडि;* पंजाबी - *खामजिरा*) वायव्य भारतात सापडते. त्याची फळे पचनाच्या आणि यकृताच्या विकारावर उपयोगी आहेत.

औषधी वनस्पती

# संदर्भ - सूची


अघारकर, एस. पी. – १९३३. गॅझेटियर, मुंबई राज्य जनरल - ए, बॉटनी पार्ट - I - मेडिसिनल प्लांटस, मुंबई.

उपहोप, जे. सी. – १९५९. डिक्शनरी ऑफ इकॉनॉमिक प्लांट्स, न्यूयार्क.

अविनाशचंद्र – इंग्लिश ट्रांसलेशन ऑफ चरक - संहिता, कलकत्ता

कीर्तिकर के. आर आणि बी. डी. बसु – १९३५. इंडियन मेडिसिन्ल प्लांट्स भाग १-४, अलाहाबाद.

गुप्ता आर. – १९७२. आगाम्मी भारतीय आर्थिक फसलोके रूपमे अत्यावश्यक औषधी एवं तेलवाले पौधे. भारतीय फार्मसी, ३३.

चोपडा, रामनाथ – १९५८. इंडिजिनस ड्रग्ज ऑफ इंडिया (१९३३ च्या आवृत्ती वरून सुधारित). कलकत्ता.

चोपडा, रामनाथ; आर. एल. बधवार आणि एस. घोष – १९४९. पॉयझनस् प्लांटस ऑफ इंडिया, नई दिल्ली.

चोपडा, रामनाथ; आय. सी. चोपडा आणि बी. एस. वर्मा – १९६९. सप्लीमेंट टू द ग्लॉसरी ऑफ इंडियन मेडिसिनल प्लांटस, नवी दिल्ली.

चोपडा, रामनाथ; आय. सी. चोपडा आणि बी. एस. वर्मा – १९६९. सप्लीमेंट टू द ग्लॉसरी ऑफ इंडियन मेडिसिनल प्लांटस, नवी दिल्ली.

चोपडा, रामनाथ; एस. एल. नायर आणि आय. सी. चोपडा – १९५९. ग्लॉसरी ऑफ इंडियन मेडिसिनल प्लांटस, नवी दिल्ली.

जैन, सुधांशुकुमार – १९६३. स्टडीज् इन इंडियन एथ्नोबॉटनी - प्लांटस युज्ड इन मेडिसिन बाय ट्रायबल्स ऑफ मध्य प्रदेश, बुलेटिन् रीजनल रिसर्च लॅब्रोटरी. जम्मू १ (२) १२६-१२८.

जैन, सुधांशुकुमार – १९६५. ऑन दि प्रॉस्पेक्टस ऑफ सम न्यू ऑर लेस नोन मेडिसिनल प्लांटस रिसोर्सेज, इंडियन मेडिकल जर्नल ५९, २७०-२७२.

जैन, सुधांशुकुमार – १९६५. मेडिसिनल प्लांट-लोर ऑफ ट्रायबल्स ऑफ बस्तर (मध्य प्रदेश), इकॉनॉमिक बॉटनी १९, २३६-२५०.

जैन, सुधांशुकुमार – १९६७. वनस्पतीकोश - उपयोगी पौधों का हिंदी-लॅटिन कोश, दिल्ली.

जैन, सुधांशुकुमार – (संपा.) १९८१ ग्लिम्पसेज ऑफ इंडियन एथनोबॉटनी, ऑक्सफोर्ड, नवी दिल्ली.

जैन, सुधांशुकुमार आणि चित्तरंजन तरफदार – १९६३. स्टडीज इन इंडियन एथनो बॉटनी-नेटिव प्लांट रेमेडीज फॉर स्नेकबाईट आमाँग दि आदिवासीज ऑफ सेंट्रल इंडिया, इंडियन मेडिकल जर्नल ५९, ३०७-३०९.

जैन, सुशांशुकुमार आणि चित्तरंजन तरफदार – १९७० मेडिसिनल प्लांटलोर ऑफ दि संथाल्स. इकॉनिमिक बॉटनी २४, २४१-२७८.

ठाकूर, जयकृष्ण-इंद्राजी – १९२५. श्री कच्छस्थास्ननी वनस्पतीयो अने तेना उपयोगिता, मुंबई.

त्रिवेदी, कृष्णप्रसाद – १९६१-६७ धन्वंतरि वनौषधि विशेषांक भाग १-४ अलीगढ.

दत्त, यू. सी. – १८७०. दि मटेरिया मेडिका ऑफ दि हिंदूज, कलकत्ता.

दस्तूर, जे. एफ. – १९५१. मेडिसिनल प्लांटस ऑफ इंडिया एंड पाकिस्तान, मुंबई.

नाडकर्णी, ए. के. – १९५४. डॉ. के. एम नाडकर्णीज, इंडियन मटेरिया मेडिकाची सुधारित आवृत्ती.

विश्वास, के. पी. – १९५६. कॉमन मेडिसिनल प्लांटस ऑफ दि दार्जीलिंग अँड दि सिक्कीम हिमालयाज, कलकत्ता.

विश्वास, के. पी. आणि ई. घोष – १९५०-५२. भारतीय वनौषधि भाग १-२, कलकत्ता

बी. पी. सी. – १९६३ ब्रिटिश फॉर्मस्यूटिकल कोडेक्स, लंडन.

भंडारी, चंद्रराज – १९५१-५७. वनौषधि चंद्रोदय, भाग १-१० वाराणसी.

भटनागर, एस. एस. व इतर – १९६१. बायलॉजिकल अॅक्टीविटी ऑफ इंडियन मेडिसिनल प्लांटस, इंडियन जर्नल ऑफ मेडिकल रिसर्च ४०, ७९९-८१३.

भटनागर, एस. एस. व इतर – १९६१. फिजिआलॉजिकल अॅक्टीविटी ऑफ इंडियन मेडिसिनल प्लांटस, जर्नल ऑफ सायंटिफिक अँड इंडिस्ट्रियल रिसर्च, परिशिष्ट २० ए; १.२४.

भारत की संपदा, अर्थात वेल्थ ऑफ इंडिया (रॉ मटेरियल्स) – १९४८-६६ भाग १-७; नवी दिल्ली.

भिषगरत्न, कुंजलाल – १९०७-१६ इंग्लिश ट्रांसलेशन ऑफ सुश्रुतसंहिता, कलकत्ता.

मजूमदार, गिरजाप्रसाद – १९२७. वनस्पती-प्लांटस अँड प्लांट-लाइफ इज इन इंडियन ट्रीटाइजेस अँड ट्रॅडीशंस, कलकत्ता.

महेश्वरी, पंचानन आणि उमराव सिंह – १९६५ डिक्शनरी ऑफ इकॉनॉमिक प्लांटस इन इंडिया, दिल्ली.

मुखर्जी, बी. – १९५३ दि इंडियन फार्मस्यूटिकल कोडेक्स नवी दिल्ली.

म्हास्कर, के. एस. आणि जे. एस. कायुस – १९३१. इंडियन प्लांट रेमेडीज युज्ड इन स्नेक-बाइट, इंडियन मेडिकल मेमॉयर्स, १९.

यू. एस. डी. – १९५५. युनायटेड स्टेट्स डिस्पेंसेटरी, फिलाडेल्फिया.

वॉट, जॉर्ज – १८८९-९३ ए डिक्शनरी ऑन एकोनॉमिक प्रॉडक्टस ऑफ इंडिया भाग १-६ कलकत्ता.

वीरमानी, ओ. पी. आणि इतर – १९८०. करंट स्टेटस ऑफ मेडिसिनल प्लांट इंडस्ट्री इन इंडिया, इंडियन ड्रग्ज १७(१०) ३१८-३४०.

वरेन, आर. सी. – १९५०. पॉटर्स सायक्लोपेडीया ऑफ बॉटनिकल ड्रग्ज अँड प्रिपेरेशंस (सुधारित आवृत्ती), लंडन.

व्हिटनै, डब्लू. डी. – १९६२. अथर्व-वेद संहिता भाग १-२ वाराणसी

शाह, एन. सी. – १९८१ नीड ऑफ सिस्टेमॅटिक कल्टिवेशन अँड कलेक्शन ऑफ मेडिसिनल हर्ब्स, इंडियन ड्रग्ज १८ (६), २१०-२१७.

संतापाऊ, हेरमेनगिल्ड – १९६३. फ्लोरा ऑफ खंडाळा ऑन वेस्टर्न घाट्स ऑन इंडिया १६(१) १-३३५.

सुंदरराज, डॅनियल आणि जी. बालसुब्रमण्यम – १९५९. गाइड टू एकोनॉमिक प्लांटस ऑफ इंडिया, मद्रास.

**या संदर्भात अनेक मासिके चाळली, ती इकॉनॉमिक बॉटनी, फारमाकॉलॉजी, फार्मसी, आणि (औषध) मेडिसिन या विषयाची आहेत. त्यांची नावे खालीलप्रमाणे आहेत.**

**इंडियन जर्नल ऑफ फार्मसी**

**इंडियन जर्नल ऑफ मेडिकल रिसर्च.**

**जर्नल ऑफ सायंटिफिक अँड इंडस्ट्रियल रिसर्च.**

# सूची

